# OUR WIDOWS.



AN ORIGINAL STORY

IN MARATHI

BY

MISS ANSTICE ABBOTT.

REVISED BY

MR. N. V. TILAK.

Commit thy fatherless children *to me*;
I will preserve them alive;
And let thy widows trust in me.

*Jeremiah* 49 : 11.





BOMBAY:

PRINTED AT JAVAJI DADAJI'S "NIRṆAYA-SAGARA" PRESS.

1901.

# आमच्या विधवा.





ही गोष्ट

मूळ

मिस् आंस्टिस् आबट

यांनीं लिहिली

ती

रा. रा. नारायण वामन टिळक

यांनीं सुधारून मराठींत उतरली.

" तूं आपलीं अनाथ पोरें माझे स्वाधीन कर, मी त्यांस जीवंत रक्षीन; आणि तुझ्या विधवा मजवर भाव ठेवोत."

इर्मया ४९:११.

# PREFACE.



This story is written from love to the women of India; and in the hope that the friends of widows, and widows themselves, in reading the book, may see how trust in Christ would better their condition; and that in seeing, they may accept the loving tenderness of the Father of the fatherless and the Protector of the widow.

# प्रस्तावना.



हिंदुस्थानच्या स्त्रियांवर आमचें जें प्रेम आहे, तेणेंकरून ही गोष्ट लिहिण्याची आह्मांला प्रवृत्ति झाली. ही लिहीत असतां आमचा हेतु एकच होता व आज आहे कीं, हिच्या वाचनानें, स्वतः विधवांच्या व त्यांच्या कैवाऱ्यांच्या लक्ष्यांत यावें कीं, विधवांची आज कालची स्थिति सुधारण्यास, प्रभु येशू ख्रिस्ताच्या प्रीतीसारखें दुसरें कांहीं नाहीं, व हें लक्ष्यांत येतांच त्यांनीं त्या पोरक्या पोरांच्या बापाची व विधवांच्या संरक्षकाची वृत्ति कशी प्रेमळ आहे तें समजून त्याच्या स्वाधीन व्हावें.

# आमच्या विधवा.



सन १८७६–७७ सालच्या दुष्काळाची तुह्मांला आठवण असेलच. त्या वेळेस मध्यप्रदेशांतील एका शहरांत, एका मिशनेरी मडमेनें शाळा घातली होती. त्या शाळेंत पुष्कळ दुष्काळपीडित मुलांना आश्रय मिळाला. एक दिवस एक मरणोन्मुख झालेली ब्राह्मणबाई, एका दोन तीन वर्षांच्या मुलीस घेऊन, ह्या मडमेकडे आली. तिचे डोळे बोट बोट खोल गेले होते; नित्य एकादशी आणि शिवरात्र पडत असल्यामुळें, तिचे एकसारखे झोंके जात होते; तिच्या तोंडांतून शब्द निघण्याची मारामार पडत होती. ती मडमेला ह्मणाली "मडमसाहेब, मी आतां मरणाच्या पंथास लागलें आहें. माझीं सारीं मुलें, अन्नान्न करून मरून गेलीं. यजमानांचा पत्ता नाहीं. ते दूरदेशीं निघून गेले आहेत. ही एक पोर राहिली आहे. सांभाळा! घ्या हिला! हिचे आईबाप तुह्मीच व्हा!" हे शब्द तिनें मोठ्या कष्टानें उच्चारिले. मडमेनें त्या मुलीला जवळ घेतली व तिच्या आईला ती कांहीं बोलणार, इतक्यांत ती मूर्च्छा येऊन धाडकन् खालीं पडली. हें पाहून मडमेनें लागलीच आपल्या चाकरांना हाक मारिली, व तिला उचलून आंत घेऊन जायाला सांगितलें. चाकर तिच्या जवळ

येत आहेत तोंच कांहीं हिंदुलोक तेथें जमले. त्यांत त्या बाईच्या ओळखीचे कित्येक ब्राह्मण होते. पाहातात तों त्या मूर्च्छेतच बाईचा प्राण निघून गेला. त्या ब्राह्मणांनीं, मडमेची परवानगी घेऊन, तिचें प्रेत दहनार्थ उचलून नेलें. मात्र तिच्या त्या लहान मुलीचा कोणी पूसतपासहि केला नाहीं. ती मडमेजवळच राहिली.

दुष्काळ व महामारी यांनीं आसपासच्या सर्व गांवांत कहर करून दिला होता. तरी ती मडम व तिच्या मैत्रिणी, देवावर भरंवसा ठेवून, अगदीं न डगमगतां, चोहोंकडे हिंडून गरीबगुरिबांचें साह्य करण्यांत सदा तत्पर असत. आपल्या मुलांचा, उपासमरीपासून बचाव व्हावा ह्मणून, पुष्कळ दीन, अनाथ लोकांनीं आपलीं मुलें, मडमेच्या स्वाधीन केलीं. त्या दयाळू मडमेनें, मोठ्या ममतेनें अशा मुलांचा अंगीकार केला; व अनेक अडचणी आल्या, पुष्कळ त्रास पडला, तरी त्यांस न जुमानतां त्यांचा आनंदानें प्रतिपाळ केला. ह्या नवीन मुलीचें, ह्मणजे या मरण पावलेल्या ब्राह्मणबाईच्या कन्येचें, नांव चंद्रानना होतें. पण इतकें लांबलचक नांव उच्चारण्याच्या ऐवजीं, तिला सारीं चंद्रीच ह्मणत असत.

ह्या गोष्टीस एक वर्ष झालें. तितक्या मुदतींत चंद्रीचा तो पहिला हाडांचा सांगाडा झांकत झांकत जाऊन, ती चांगली पुष्ट झाली व सुरेख दिसूं लागली. ती थोडीशी उंचहि झाली.

याप्रमाणें त्या दयाळू मडमेच्या हाताखालीं, तिच्या शरीराची व मनाची झपाट्यानें वाढ होत आहे, तों एक दिवस एकाएकीं, एक अपरिचित गृहस्थ मडमेकडे येऊन "चंद्री कोठें आहे? कृपा करून तिची माझी भेट करून द्या" ह्मणून विनवूं लागला. मडमेला असल्या कित्येक अनुभवांवरून, त्याचा प्रथम संशय आला; व तिनें चौकशी केल्यावरून तो ह्मणाला– "दारिद्र्याच्या त्रासानें, घर सोडून गेल्याला मला तीन वर्षें झालीं. मी उद्योग धंदा पाहाण्यासाठीं, फार दूर गेलों होतों. माझी बायको व लेंकरें, येथून जवळच एका खेड्यांत, माझ्या भावाजवळ होतीं. कोणाचा भाऊ आणि कोणाचें कोण? व्यर्थ मायाजाळ आहे सारें. गतवर्षींच्या दुष्काळांत, हे आमचे बंधुराज माझ्या कुटुंबाचे काळ बनले! त्याची वाताहत झाली; पोरें एकामागून एक पटापट मरून गेलीं; बायकोनें आपल्याच पायांजवळ प्राण सोडिला! इकडे आल्यावर मला ही सर्व हकीगत समजली. आपण दयाळू होऊन, एका मुलीला आश्रय दिला, ह्मणून ती जगली. देव आपलें कल्याण करो; आपलीं नातवंडें पंतवंडें सुखानें राज्य करोत! ती मुलगी आतां तुमचीच आहे; तुह्मीच तिचे मायबाप आहां. तिच्या दैवानें ती चांगल्या ठिकाणीं येऊन पडली आहे. तिला कर्मकरंटा मी आपणाजवळ नेत नाहीं. कधीं कधीं येऊन, तिला डोळे भरून पाहावें इतकीच आतां माझी इच्छा आहे." हें भाषण ऐकून मडमेची खात्री झाली कीं, हा गृहस्थ चंद्रीचा

बापच आहे. तिनें चंद्रीला बोलावून आणिलें. त्या गृहस्थानें तिच्याकडे पाहून, फार समाधानवृत्ति दाखविली, व मडमेला ह्मटलें— "बाई, करा आतां हिचा असाच सांभाळ; चंद्री तुमच्या ओंटींत घातली आहे." नंतर त्यानें चंद्रीचें चुंबन घेतलें, मडमेला लवून सलाम केला, व तेथून पाय काढिला. त्याच्या अंत:करणांत कसले कृतघ्नपणाचे विचार चालले होते, हें बिचाऱ्या मडमेला काय ठाऊक? मुलीला आपल्या स्वाधीन करून तो गेला, ह्मणून तिला मोठा आनंद झाला. वास्तविक पाहिलें तर बापानें येऊन मुलीला शाळेंतून काढून नेण्याची, ती वेळ नव्हती. ती वेळ ह्मणजे, मुलगी आठदहा वर्षांची झाली कीं येत असते. कारण तें वय तिच्या लग्नाचें!

कोंवळेपणीं झाडाची वाढ फार जोमाची असते, तसेंच प्राण्यांचें आहे. मनुष्याच्या शरीराचें, व मनाचेंहि तसेंच आहे. जों जों वय वाढत चाललें तों तों, चंद्री आंगीं पिंडीं अधिकाधिक उंच व गोंडस दिसूं लागली. तसाच तिचा स्वभावहि मोठा पाणीदार व चपळ होऊं लागला. आपल्या अभ्यासाकडे तिचें लक्ष्य फार असे; वाचन, गणित इत्यादि मुख्य मुख्य विषयांत ती आपल्या वर्गांतील सर्व मुलींपेक्षां फार पुढें असे. तिचें बोलणें खरें, व वर्तन प्रामाणिकपणाचें असे. पण तिला एक खोड होती; ह्मणजे राग मात्र सदा तिच्या नाकावर बसलेला असे; आणि कोणाच्या सांगण्याप्रमाणें वागणें तिला आवडत

नसे. तरी प्रीतीच्या माणसापुढें तिच्या सारखी लवणारी तीच होती; इतर कोणाची तिच्या पुढें प्रतिष्ठा नव्हती; पण ती आपल्या मडमेच्या अर्ध्या वचनांत होती. केवळ मडमेला वाईट वाटूं नये ह्मणून, ती आपल्या शिक्षकिणींचें ऐके; व चाकरांना धुडकावून देत नसे. ती शरीरानें सुंदर व इभ्रतदार असून, बुद्धीनें फार हुशार होती, त्यामुळें शाळेंतील लहान मोठ्या मुलींवर तिचें फार वजन पडत असे. तिचा ताबा त्यांस नेहमींच आवडत असे असें नाहीं, तरी त्यांच्यांत ती एखाद्या राणीसारखी वागत होती व शोभतहि होती.

पवित्र शास्त्रांतील कथानकांची तिला फार आवड असे. तसेंच येशू ख्रिस्तावरचीं गाणीं तिला मनापासून आवडत. तथापि ह्या दोहोंतील विचार तिच्या मनांत बिंबून जात, असें मात्र ह्मणतां येत नाहीं. आपण येशूवर प्रीति करितों असें तिला वाटे व तसें ती बोलूनहि दाखवी पण तिचें वर्तन, थेट येशूच्या आज्ञेला अनुसरून आहे असें कधीं दिसलें नाहीं. तरी ती सुरेख, टापटिपीनें राहणारी, हुशार व आज्ञाधारक अशी एक मुलगी होती.

ह्याप्रमाणें सुमारें पांच वर्षें गेलीं. एक दिवस मडमेनें शाळेंतल्या सर्व मुलींना, दोन शिक्षकिणी बरोबर देऊन, गांवाबाहेर फिरावयास पाठविलें. त्यांत चंद्रिकाहि होती. शिक्षकिणी पुढें चालत असून, मुली त्यांच्या मागें चालल्या होत्या. नेहमींप्रमाणें

दोन्ही बाजूंनीं गाड्यावोड्यांची व वाटेच्या वाटसरांची जा ये चालूच होती. त्यापासून कधीं कांहीं दगा झाला नसल्यामुळें सहजच शिक्षकिणींना किंवा मुलींना त्याचें कांहीं वाटत नव्हतें. तथापि ह्या वेळेस एक गाडी मुलींच्या अगदीं जवळून चालली होती. ती येत येत येऊन चंद्रीजवळ थांबली; व एका क्षणांत एका मनुष्यानें खालीं उडी टाकून, तिला उचलून आंत घेतलें. लागलीच गाडी भरधाव निघाली, ती हां हां ह्मणतां ह्मणतां पार दृष्टीआड निघून गेली. चंद्रीला उचलिल्याबरोबर तिच्या जवळच्या मुलींनीं घाबरून किंकाळी फोडिली; इतर मुलीहि रडूं ओरडूं लागल्या. बिचाऱ्या शिक्षकिणींना त्या गोंधळाचा अर्थ मुळींच न समजून त्या घाबरून गेल्या. "अगे, झालें तरी काय? नीट सांगाल तर खरें!" अशी बरीच विचारपूस केल्यावर त्यांना खरें कारण समजलें. त्याबरोबर त्यांचीं धाबीं दणाणून गेलीं. पण करणार काय? ज्या ठिकाणीं हा प्रकार झाला त्या ठिकाणीं दोन तीन रस्ते एकांत एक मिळून गेले होते; त्यामुळें गाडी गेली कोणीकडे, हेंच कोणाला धड सांगतां येईना. शेवटीं शिक्षकिणी मुलींना घेऊन धावपळ करीत, तशाच बंगल्यावर परत आल्या. ह्या परतल्या कां, हें बिचाऱ्या मडमेच्या लक्ष्यांत येईना. तशांत त्यांच्या रडव्या भेदरून गेलेल्या मुद्रा पाहून तिच्याहि पोटांत धस्स झालें. त्यांनीं एकच गोंधळ करून सोडिला. त्यावरून मडमेला इतकेंच सम-

जलें कीं चंद्रीला कोणी तरी उचलून नेलें. तिला फार वाईट वाटलें. तिनें आपल्या चाकर लोकांत पुष्कळ तपास केला; पण त्यांच्या कडून कांहींच सुगावा लागेना. गांवांतहि तिनें पुष्कळ शोध केला तरी कांहीं नाहीं. आसपासच्या गांवीं माणसें पाठविलीं, तरी फुकट. तिला एक मात्र वाटत असे कीं चंद्रीला नेलें तें तिच्या बापानेंच नेलें असावें. पण तो कोठून आला, कोठें गेला, त्यानें असली भामटेगिरी कां केली, ह्या गोष्टींचा उमज तिला मुळींच पडेना. आतां कांहीं केलें तरी चंद्रीचें तोंड दृष्टीस पडत नाहीं, असें होईपर्यंत तिचा तपास चालूच होता. शेवटीं तिनें तो नाद सोडून दिला. तथापि सगळ्या शाळेंत, तिचा विसर ह्मणून कोणाला पडला नाहीं. रोज सकाळीं व संध्याकाळीं, प्रार्थनेच्या वेळेस मडमेनें तिचें स्मरण करावें, व मोठ्या कळवळ्यानें ह्मणावें कीं "तो चांगला मेंढपाळ, प्रभु येशू, हें कोंकरूं जेथें असेल तेथें त्याचा सांभाळ करो." या प्रार्थनेचें उत्तर मिळालें; येशूनें चंद्रीचा सांभाळ केला. तो कसा केला तें आतां आपण पाहूं या.

चंद्रीला ह्याप्रमाणें बेधडक उचलून नेणारा हा गृहस्थ कोण असावा, त्यानें इतक्या मुलींतून तिलाच नेमकें कसें ओळखिलें, हें समजण्याची तुह्मांस इच्छा व्हावी हें साहजिक आहे. येथून, ह्मणजे चंद्री होती त्या शहरापासून, जवळच एक खेडें होतें. त्या खेड्यांत एक गृहस्थ राहत असे; चंद्रीला, किंवा मडमेला, त्याचें

जगांत अस्तित्व तरी आहे किंवा नाहीं याची सुद्धां दाद नव्हती; पण त्याचा मात्र डोळा एकसारखा चंद्रीवर होता. शाळेंत मुलींच्या तैनातीस एक कुणबीण होती; तिचें आणि ह्या गृहस्थाचें संगनमत होतें. हा गृहस्थ चंद्रीचा चुलता असून, त्यानें व त्याच्या भावानें, ह्मणजे चंद्रीच्या बापानें, पहिल्यापासूनच बेत करून ठेविला होता कीं, शेवटीं मडमेच्या हातावर तुरी द्यावयाच्या! स्वधर्मसंरक्षणार्थ, ह्मणजे रूढीप्रमाणें, मुलीचें लग्न नवव्या किंवा दहाव्या वर्षाच्या आंत करून टाकून, ब्राह्मण्याचा दिवा लावण्याकरितां, विश्वासघात करण्यांत काशीनाथपंतास कांहींच पाप वाटत नव्हतें. असो; चंद्रीला नववें वर्ष लागलें, आतां तिला लग्नाची ठेवणें नीट नाहीं, असें पाहून काशीनाथपंतानें मुंबईस तिच्या लग्नाचें जमविलें. चिंतोपंत ह्मणून त्याचा एक बाळमित्र होता, तो खाऊन पिऊन सुखी असून, त्याचा एकुलता एक मुलगा नारायणराव हा त्या वेळेस मॅट्रिक्युलेशनची तयारी करीत होता. बाळपणीं, आपण पुढें व्याही होऊं असें एकदां काशीनाथपंताचें व चिंतोपंताचें सहज बोलणें झालें होतें. चिंतोपंत हजार पांचशें रुपये हुंडा हबकल्यावांचून ऐकेना. पण शेवटीं थोडक्यावरच त्याची समजूत झाली. मुलगी शाळेंत शिकलेली, तशांत मडमेच्या शाळेंत शिकलेली आहे, हें ऐकून विहिणीचें माथें भडकून गेलें होतें! पण दुसऱ्या बाया तिला ह्मणत "अहाहा! दिवे लावाल सासूपणाचे! अहो, शिकलेली

असली ह्मणून काय झालें? वठणीस आणणें तर तुमच्या हातीं आहे ना?" हे शब्द कानीं पडल्याबरोबर रखमाकाकूला स्वाभिमान उत्पन्न होई; व करीन तर हीच सून करीन, असा तिचा निश्चय होई. व्याहीबुवांस व जांवईबापूंस याचें कांहींच वाटलें नाहीं. कारण पहिले ख्रिस्ती शाळेंत शिकून, मिशनेरीच्याच शिफारसीनें अन्नापाण्याला लागले होते; व दुसरे त्याच मार्गांत होते. शिवाय नारायणरावाला तर आपणास शिकलेली बायको मिळावी असेंच फार वाटत होतें. खरें ह्मटलें तर त्याला काय वाटत होतें, हें विचारतो कोण? वधूवरांचीं टिपणें जमलीं, करार बिरार झाले, व चंद्रीला घेऊन येतों ह्मणून सांगून काशीनाथपंत परत आले. मडमेच्या परवानगीनें, चंद्रीला शाळेंतून काढून न्यावें, असें काशीनाथपंताच्या प्रथम मनांत आलें. पण त्याच्या भावाला, व वर सांगितलेल्या ठकाईमावशीला, तो विचार मुळींच पटेना. मडम मोठी धूर्त असून, कोणत्याहि थापांनीं फसली जाणार नाहीं; बरें तुह्मी मुलीला बळेंच घेऊन चाललां तर ती तुमच्यापासून आजपर्यंत झालेला सर्व खर्च, ह्मणजे दोन अडीच हजार रुपये, चोपून भरून घेईल; इत्यादि अडचणी पुढें आणून, त्यांनीं काशीनाथपंताचा पहिला विचार अगदीं मोडून काढिला. शेवटीं ठकाईमावशीनेंच कांहीं तरी युक्ति करून, चंद्रीला काशीनाथपंताच्या स्वाधीन करावें, व ह्या कामगिरीबद्दल तिला आगाऊ पन्नास, व मागाहून पन्नास, असे

शंभर रुपये इनाम ह्मणून द्यावे असें ठरलें. त्याप्रमाणें त्या बाईनें कोणत्या तजविजी केल्या, ती मुलगी ओळखतां यावी ह्मणून, फिरायाला निघण्यापूर्वीं तिच्या वेणींत कोणतीं खुणेचीं फुलें घातलीं, वगैरे कच्ची हकीगत सांगत बसण्याची आह्मांला गरज वाटत नाहीं. पूर्वींच सर्व गोष्टी ठरवून ठेविल्याप्रमाणें, काशीनाथपंतानें नेमका डाव साधून, चंद्रीला पळविलें इतकें समजलें ह्मणजे पुरे.

गाडींत बसल्याबरोबर, चंद्री मोठ्यानें किंकाळी फोडण्याच्या बेतांत होती, पण काशीनाथपंतानें तिच्याकडे एकेक डोळा वाघासारखा करून "चूप रहा" ह्मणून ठोसा उगारिला. त्याबरोबर ती जागच्या जागींच गर्भगळीत होऊन बसली. गाडी बरीच दूर गेल्यावर तो तिला गोंजारून ह्मणाला "चंद्रे, तूं भिऊं नको, मी कांहीं कोणी परका नाहीं. मी तुझा बाप आहें; तुला आपल्या बापाच्या घरीं जावेंसें वाटत नाहीं का?" आणखीहि तो बरेंच बोलला. चंद्री अजून लटलट कांपत होती; तिनें हूं का चूं देखील न करितां, त्याचें तें चऱ्हाट निमूटपणें ऐकून घेतलें. हा आपला बाप असावा असें तिला मुळींच वाटेना. आपण एकाएकीं नाहींशी झालों, हें पाहून आपल्या मायाळू मडमेला काय वाटेल, हा असला वाईट मनुष्य आपलें पुढें करणार तरी काय, इत्यादि विचारांनीं ती अगदीं गांगरून गेली. एका तासाच्या आंतच गाडी आगगाडीच्या स्टेशनावर

येऊन दाखल झाली. आतां मात्र आपण मडमेपासून दूर साता समुद्रांपलीकडे चाललों, असें पक्कें समजून चंद्री ओक्साबोक्शीं रडत सुटली. काशीनाथपंतानें, पुन्हा तिला माराचा धाक घालून, चूप केलें. त्यानें जाऊन टिकिटें काढलीं, चंद्रीला उचलून नेऊन गाडीच्या डब्यांत घातलें, व गाडी निघाली. आतां मात्र बिचाऱ्या पोरीची पक्कीच निराशा होऊन, ती संतापाच्या भरांत सारें भय विसरली, व काशीनाथपंताला पाहिजे तें बोलूं लागली. डब्यांतल्या उतारूंना हें गौडबंगाल कांहींच कळेना. जो तो हें आहे तरी काय, ह्मणून काशीनाथपंतास विचारूं लागला. काशीनाथपंतानें झालेली सगळी हकीगत त्यांस बेधडक सांगितली. ती ऐकून, एक दोन माणसांखेरीज सर्वांनीं काशीनाथपंताला शाबासकी देऊन बाट्यांच्या हातून आपली मुलगी अशी शिताफीनें उडवून आणिली, ह्मणून त्याचें अभिनंदन केलें. एक गृहस्थ एका पत्राचे एडिटर होते, ते ह्मणाले :— दुष्काळांतील पोरांची ह्या मिशनेरींना दया आली, तर त्यांनीं त्यांच्या पोटापाण्याची सोय ज्याच्या त्याच्या जातभाईच्याकडून पैसे देऊन करवावी, हा न्यायाचा मार्ग होय. कारण ज्या जातींत किंवा अवस्थेंत प्राणी जन्मला, तेथून त्याला काढणें हा अन्याय होय! दुसरे एक शास्त्रीबुवा ह्मणाले:— "स्वधर्मे निधनं श्रेयः" अहो आपल्या धर्मात, ह्मणजे जातींत राहून मेलेलें पुरवलें; दुष्काळांत पोरें मेलीं तरी हरकत नाहीं; कारण "न

जायते म्रियते वा कदाचित्" आत्मा कधीं जन्मत नाहीं किंवा मरत नाहीं; जन्म मरण हा मायेचा खेळ आहे; पण परधर्मांत जाऊन जगणें नको. सारांश, पोकळ धर्माभिमान गाजविण्याला, मिशनेरींवर तोंड टाकण्याला, व गप्पा मारण्याला, हवी तेवढी जागा मिळाल्यामुळें चार घटका डब्यांतल्या सर्व हिंदू उतारूंस बरेंच झालें. बिचारी चंद्री रडली रडली, व खरोखर हा आपला बाप आहे अशी खात्री झाल्यामुळें, निरुपाय होऊन दु:खनिद्रेंत निमग्न झाली चंद्री जागी झाल्यावर, काशीनाथपंतानें तिची बरीच समजूत केली. तिला कांहीं खायाला घेऊन दिलें. पण ती मनांतल्या मनांत एकसारखी जळफळत होती. ती ह्मणे "हा माझा बाप खरा; पण यानें मडमेशीं अशी लबाडी कां करावी? असल्या लबाड, रागीट बापापेक्षां माझी मडम किती चांगली?" बरीच रात्र झाल्यावर तिला पुन्हा झोंप लागली; गाडी मुंबईस जाऊन दाखल झाली, तरी ती झोंपेंतच होती. तिच्या बापानें तिला उठवून खालीं उतरिलें व तीं दोघें एका रेकल्यांत बसून निघालीं. मुंबईचें तें भव्य स्टेशन, ती लोकांची गर्दी, गाड्या-घोड्यांचा एकच धुमाकूळ, उंच टोलेजंग इमारती पाहून चंद्रीचें मन अगदीं गोंधळून गेलें; व प्रीतीनें नाहीं तर भीतीनें तरी ती आपल्या बापाच्या आश्रयाची किंमत ओळखूं लागली. रेकला येऊन एका चाळीजवळ थांबला. काशीनाथपंत व चंद्री एका मोठ्या जिन्यानें चढून, चाळीच्या दुसऱ्या मजल्यावर गेलीं.

त्या वेळेस सकाळचे आठ साडे आठ वाजले होते, त्यामुळें चाळींतील पुरुषमंडळी कोणी स्नानसंध्येच्या, कोणी बाजारहाटाच्या, कोणी कशाच्या, कोणी कशाच्या तरी गडबडींत होती. बायका घरांतल्या कामकाजांत गढून गेल्या होत्या. तरी मुलें त्या वेळेस घरींच होतीं. त्यांचा एकच घोळका चंद्रीभोंवता जमला. कोणी तिचा खिस्ती चालीचा पोशाख पाहून फिदि फिदि हंसूं लागलीं. त्यांनीं कांहीं तरी आणखी खोड्या केल्या असत्या; पण काशीनाथपंतांनीं एकदा नारसिंह दृष्टीनें त्यांच्याकडे पाहिल्याबरोबर सगळीं चूप झालीं. एका गृहस्थानें काशीनाथपंतास नमस्कार करून ह्मटलें "कां! बरे खुशाल? हीच का तुमची मुलगी? वा! फार हुशार दिसते!" इतक्यांत एका बाईनें पुढें येऊन त्या दोघांस आपल्या बिऱ्हाडांत नेलें. या वेळेस जर चंद्रीच्या भावी सासरचीं माणसें तेथें असतीं, आणि त्यांनीं तिची ती दुःखी हट्टी रागीट मुद्रा, ते विसकटलेले केस, तो शाळेंतला पोशाख वगैरे प्रकार पाहिला असता, तर तेथल्या तेथें त्यांनीं तें लग्न मोडून टाकिलें असतें. पण तसें झालें नाहीं; ज्या घरीं हीं दोघें उतरलीं होतीं, तेथील घरधनिणीनें लागलेंच नेऊन चंद्रीला न्हाऊं माखूं घातलें. जेवणखाण झाल्यावर चंद्री निजली व काशीनाथपंत उठून बाजारांत गेले.

चंद्री उठून तिची वेणी फणी होत आहे तों काशीनाथपंत बाजारांतून साडीचोळी घेऊन आले. त्यांनीं बरोबर एका कां-

साराला आणिलें होतेंच. एक सोनारहि तयार होताच. बापाच्या आज्ञेला मान देऊन चंद्रीनें मोठ्या कष्टानें शाळेंतल्या पोशाखाला रजा दिली. साडी कशी नेसावी हें तिला काय ठाऊक ? मथुराबाईनें ह्मणजे त्यांच्या घरधनिणीनें तिला ती नेसविली; कांसारानें तिच्या हातांत चांगल्या उंची उंची बांगड्या भरिल्या. हें बांगड्यांचें दिव्य आटपल्यावर पोतदार पुढें झाले. आतां मात्र तिनें मी आपल्या नाकाकानांला, तीं हिडीसवाणीं भोंकें कधीं पाडूं देणार नाहीं ह्मणून साफ सांगितलें. पण तिचें ऐकतो कोण ? "चावटपणा करिशील तर अशी भडकावीन एक मुस्कुटांत !" इतके शब्द बापाच्या तोंडांतून निघतांच बिचारी त्या अपेष्टांनाहि मान्य झाली. हा सगळा विधि झाल्यावर मथुराबाई हसत हसत ह्मणाल्या "अहाहा ! आतां कशी ब्राह्मणाच्या मुलीसारखी सुरेख दिसूं लागलीस !" असें ह्मणून तिनें तिच्या वरून हात ओंवाळून कडकडां बोटें मोडिलीं. चंद्रीला हा वेडगळपणा पाहून हसूं आलें. मीठ मोहऱ्या आंगावरून उतरणें, बोटें मोडणें, हे दृष्ट काढण्याचे प्रकार आहेत! पण चंद्रीला तें काय माहीत ? चंद्री खरोखरच सुंदर होती. "जातीच्या सुंदरांला कांहींही चालतें" ह्या न्यायानें या पोशाखांतहि ती चांगली खुलूं लागली. मथुराबाईनें आपले दागिने काढून तिच्या आंगावर घातले. हे दागिने लग्न होईपर्यंत मात्र तिच्या आंगावर रहायाचे होते; नंतर सासरचे दागिने आंगावर पडत असतात. कांसार व सो-

नार यांच्या तडाक्यांत सांपडली असतां तिला रडून रडून पुरेसें झालें होतें; ह्मणून मथुराबाईनें तिला घरांत जाऊन तोंड धुऊन यावयाला सांगितलें. चंद्री तोंड धुऊन बाहेर आली मात्र, तोंच सगळीं माणसें तिच्यावर वाघासारखीं चवताळून गेलीं. संतापाच्या भरांत तिच्या बापानें तर तिच्या लखकन् तोंडांतच दिली. या गहजबाचें कारण काय तें तिला मुळींच न समजल्यामुळें, ती फारच गोंधळून गेली. "अभद्र कारटी ! कुंकू पुसून टाकलेंस आं !" या व अशा प्रकारच्या उद्गारांवरून, आपण तोंड धुतांना कपाळावरचा लाल डाग धुऊन टाकिला, ह्मणून हे रागावले आहेत इतकें तिच्या लक्ष्यांत आलें पण त्यांत अभद्र काय झालें तें तिला समजेना. शेवटीं मथुराबाईनें तिला घरांत नेलें व पुन्हा कुंकू लावून, त्याचा अर्थ तिला नीट समजावून दिला. याप्रमाणें तिचें नटणें थटणें आटपतें आहे तोंच, सासरचीं माणसें तिला पाहायाला आलीं. सासू ह्मणजे चंद्रीची भावी सासू रखमाबाई हिला व तिच्या मैत्रिणींना मथुराबाईनीं मोठ्या अदबीनें घरांत नेलें व सासऱ्याला ह्मणजे चिंतोपंताला, काशीनाथपंतानें, बाहेरच्या बसण्या उठण्याच्या खोलींत, हात धरून गालिच्यावर लोडाशीं टेंकून बसविलें. देव, गुरु, आईबाप यांना हिंदुधर्मांत फार मान आहे; पण व्यवहारांत मुलीचे आईबाप जसा मान व्याहीविहिणीला देतात, तसा कधीं कोणी कोणाला देत नसेल. "विहिणीचा पापड मोडावयाचा !" अशी एक मरा-

ठींत ह्मण आहे, तिचा मूळ अर्थ असा आहे कीं, पाहिजे तितकी तब्येत राखिली, तरी शेवटीं पापड मोडण्यासारख्या क्षुल्लक कारणानें तरी विहीण रुसायाचीच! व्याही आणि विशेषतः विहीण, यांची ही असली देवसेवा, पुढें त्यांनीं आपल्या मुलीला गांजूं नये ह्मणून होत असते. यावरून आपलें कोंवळें, अल्लड, अज्ञ बाळ, ज्या परक्यांच्या हवालीं या हिंदु मातापितरांस करावें लागतें, त्यांजवर त्यांचा कितपत विश्वास असतो, हें सहज समजून येतें. सासू, सासरा, नवरा, दीर, जावा, नणंदा हे सहासुरे जेथें आहेत तें सासुरें अशी सासर या शब्दावर हिंदु हरिदास नेहमीं कोटि करीत असतात. "सासु, स्वशुर, दिर, जावा, नणंदा, छळितिल, किंवा करितिल ममता?" ही काळजी मुलींच्या आईबापांस एकसारखी जाळीत असते, असें त्यांच्या लोकप्रिय, केवळ काल परवां होऊन गेलेल्या, एका कवीचें ठाम मत आहे. सारांश सासरीं मुलीला पाठविणें ह्मणजे काय, तेथें तिला सुशिक्षण मिळण्याचे ऐवजीं नुसता जाच मात्र कसा भोगावा लागेल, बालविवाहामुळें पुढें जन्मभर तिच्या शरीराचा व मनाचा कसा नाश होईल, इत्यादि सर्व गोष्टींचे विंचू, ह्या लोकांस मुलगी उपजल्यापासून झोंबलेले असूनहि, ह्या दैववादी लोकांचें रूढीपुढें कांहीं चालत नाहीं. असो; घरांत रखमाबाईनें एखाद्या गुराप्रमाणें चंद्रीची तपासणी, ह्मणजे विटंबना केल्यावर, तिला बाहेर आणिलें. नंतर तिची येणेंप्रमाणें जबानी! झाली.

**चिंतोपंत**— मुली, लाजूं नको. ये पाहूं जरा पुढें. तुझें नांव काय?

**चंद्री**— (पुढें येऊन) मला चंद्रानना ह्मणतात.

**चिंतो०**— तूं कोणाची मुलगी?

चंद्री कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून पुन्हा ह्मणतात— "बरें, तुझ्या बापाचें नांव काय तें तुला ठाऊक आहे का?"

**चंद्री**— मला नाहीं ठाऊक.

**काशी०**— नीट सांग. मी कोण तुझा?

**चंद्री**— तुह्मी मला आपली मुलगी ह्मणतां; पण खचीत तुह्मी माझे बाप नाहीं. बाप असतां तर मला माझ्या मडमे-पासून अशी चोरासारखी पळवून कां आणितां? मला माझ्या मडमेकडे जाऊं द्या! ऊं! ऊं! (ह्मणून ती रडूं लागली.)

**चिंतो०**— याचा काय अर्थ काशीनाथपंत!

काशीनाथपंतानें थोडक्यांत आपली सगळी हकीगत सांगि-तली. ती ऐकून त्याच्या शहाणपणाची ज्यानें त्यानें वहावा केली. तेथें एक विद्वान् गृहस्थ बसले होते, ते ह्मणाले:— "अहो म्लेंच्छांपासून आपलें रक्षण करायाला साम, दाम, दंड, भेद, हे चार मार्ग सांगितलेच आहेत. जिचा परिणाम चांगला, ती लबाडी, मुळीं लबाडीच नव्हे. श्रीकृष्ण परमात्म्यांनीं मोहिनीचें

रूप घेऊन असुरांना फसविलें नाहीं का?" चंद्री लहान होती, तरी ह्या एकंदर भाषणावरून, हा सगळा पाप्यांचा बाजार आहे इतकें तिचे लक्षांत आलें.

**चितो०**— चंद्रानना, काशीनाथपंतांनीं तुला कां पळवून आणिलें तें तुला आतां समजलें ना नीट? बाई, तुझा बाप होता म्हणून तूं त्या मडमेच्या हातून सुटून, पुन्हा ब्राह्मणांत आलीस! याबद्दल त्याचे उपकार मान.

**चंद्री**— उपकार मानूं? कशाचे? माझ्या मडमेपासून मला चोरून आणल्याचे? ब्राह्मणांला देवाच्या दहा आज्ञा ठाऊक नाहींत का?

**काशी०**— पुरे, पुरे आतां! चूप! उगाच बडबड नको करूं.

**चितो०**— बरें मुली, तूं काय शिकली आहेस?

**चंद्री**— (रडत रडत) मी चौथी इयत्ता शिकत आहें. मला शिवणकाम येतें, गाणीं येतात, विणतां येतें; मडम आम्हांला रोज पवित्रशास्त्रांतून एक ओवी पाठ करायाला सांगे, त्यामुळें मला पुष्कळ ओव्याहि पाठ येत आहेत.

**चितो०**— येत असतील; पण स्वयंपाक करतां येतो का? धुणीं धुतां, भांडीं घांसतां, येतात का?

**चंद्री**— स्वयंपाक थोडा थोडा येतो; पण धुणीं आणि भांडीं मोठाल्या मुलीच करीत, म्हणून मला येत नाहींत.

**चिंतो०**— मुली, जा आतां तुला पाहिजे तर घरांत. (काशीनाथपंताकडे वळून) मुलगी हुशार दिसते. अंमळशी हट्टी आहे, व विनय मुळींच नाहीं; पण ह्या ख्रिस्ती लोकांच्या शाळेंत रहाण्याचा परिणाम. माझें शिकणें ख्रिस्ती शाळेंतच झालें आहे, त्यामुळें मी सुद्धां लहानपणीं पक्का सुधारक बनलों होतों, पण एकदा इकडचें वळण लागलें तसा आपोआप शुद्धीवर आलों. तशीच ही देखील, एकदा लग्न होऊन सासरीं येऊन पडली, कीं आत्तां सरळ येईल.

**काशी०**— तें तुमचें तुह्मी पाहून घ्या. आह्मी तिला तुमच्या पदरांत घालीत आहों.

हें बोलणें चाललें असतां चंद्री बराच वेळ तेथें उभी होती. वधूवरांचीं टिपणें त्यांनीं आधींच पाहिलेलीं होतीं. आतां विहिणीजांवयांच्या मानापानाचे ठराव झाले, आणखी कित्येक किरकोळ बाबींविषयीं वाटाघाट झाली. चंद्रीला त्यांतलें कांहीं समजलें; कांहीं समजलें नाहीं. आपलें लग्न होणार इतकें मात्र तिला चांगलें समजलें; पण लग्न ह्मणजे काय? तिच्या वयाच्या हिंदू मुलींना तें सहज सांगतां आलें असतें, पण त्या ख्रिस्ती मुलीला तें एक गूढच होतें.

लग्नाचा दिवस येईपर्यंत, चंद्रीचे दिवस चाळींतल्या मुलीबाळींबरोबर खेळण्याहसण्यांत तेव्हांच निघून गेले. ती त्यांना

शाळेंत शिकून घेतलेलीं गाणीं ह्मणून दाखवी, शास्त्रांतल्या गोष्टी सांगे, खेळ शिकवी. तिच्या या करण्यानें कित्येक मुलींना ख्रिस्ताची व ख्रिस्ती शाळेची थोडी बहुत माहिती होऊन आवड उत्पन्न झाली. एका दहा बारा वर्षांच्या सासुरवासी मुलीला तर, ती त्या गोष्टी सांगूं लागली कीं रडूंच येत असे. चंद्रीला देखील मडमेची आठवण होऊन, केव्हां केव्हां फारच भरतें येई. तरी तिच्या वयाला अनुसरून, खेळण्याच्या भरांत, ती बरीच रमून जात असे. शिवाय तिला पूर्वगोष्टींचा विसर पडावा ह्मणून, तिचा बापहि तिच्याशीं फार ममतेनें वागूं लागला. असो; हळू हळू वऱ्हाडी येऊन दाखल झाले, व लग्नदिवस येऊन ठेपला.

लग्नदिवसापूर्वीं एक दिवस, कित्येक किरकोळ विधि करण्यांत आले. प्रथम सकाळीं घाणा भरण्याचा समारंभ झाला. तिला आई नव्हती, ह्मणजे तिच्या बापाची हातास हात लावणारी सहधर्मिणी हयात नव्हती, त्यामुळें घाण्यापासून कन्यादानापावेतों सर्व विधि, तिच्या काकानें व काकूनें केला. घाणा भरायाच्या वेळेस, तिला आपल्या चुलताचुलतींबरोबर, थोडें दळणकांडण करावें लागलें. त्या वेळच्या त्या विशेष प्रकारच्या ओव्या, जात्याची व मुसळाची पूजा, वगैरे प्रकार पाहून तिला मोठी गंमत वाटली.

नंतर बायांनीं तिला घरांत नेऊन, अष्टपुत्री नेसविली. अष्टपुत्री ह्मणजे एक प्रकारची लहानशी साडी. ही परकरवजा

असते. ह्मणजे हिचा कासोटा घालतां येत नाहीं. लग्न लागून पुढें सुनमुखाचा विधि होईपर्यंत, वधूच्या नेसूं हेंच वस्त्र असतें. अष्टपुत्री नेसून, चंद्री गौरीहराची पूजा करावयास गेली; ह्मणजे बायांनीं तिला त्याच्यापुढें नेलें. चंद्रीनें पाहिलें तों एका पाटावर तांदूळ पसरिलेले असून, त्यावर एक करा, ह्मणजे कोरें मडकें आहे, व त्यावर एक नारळ ठेविलेला आहे. हें काय? ह्मणून तिनें विचारिल्यावरून, तिची काकू तिला ह्मणाली "बाई, हाच गौरीहर. आतां तूं डोळे मिटून गौरीहराचें ध्यान कर; व त्याच्या नांवाचा जप करून तुला जो नवरा पाहिजे आहे तो माग; तसेंच दुसरेंहि जें कांहीं मनांत असेल तें माग." चंद्रीनें त्या नारळाकडे मोठ्या आश्चर्यानें व तिरस्कारानें कांहीं वेळ पाहिलें; व मग मागें पाहून ती ह्मणाली "मी ह्या नारळाला काय ह्मणूं? मी याच्या पायां पडूं! ही तर मूर्तिपूजा आहे. मी तर ही कधीं करणार नाहीं." असें ह्मणून ती मागें सरली. भयानें ती थरथर कांपत होती. तिच्या मस्तकावर घाम डवडवला होता. तिनें हातीं दिलेलें अक्षतांचें ताट एकदम खालीं ठेविलें, व घरांत निघून जाण्याची तयारी केली. जमलेल्या बाया एकमेकींकडे पाहून, आश्चर्य करूं लागल्या. सर्वांनीं एकच गोंधळ करून सोडिला. जिच्या जें तोंडास येईल, तें ती बोलूं लागली. कोणी ह्मणाली "हें काय ग बाई? असला हट्ट ह्मणजे काय?" दुसरी ह्मणते "उद्यां सासूच्या तडाक्यांत

सांपडली ह्मणजे दोन दिवसांत हट्ट बिट्ट सारें निघून जाईल." तिसरी ह्मणाली "छे बाई, हें कांहीं ठीक चिन्ह दिसत नाहीं;" एकीचें एक आणि एकीचें एक, दहा तोंडें सुरू झाल्यावर मग त्या गारांच्या पावसाला काय ह्मणायाचें आहे? चंद्री निघाली खरी, पण तिला जाऊं देतो कोण? तिच्या काकूनें तिला हात धरून परत आणिलें. मग काय? सगळा घोळकाचे घोळका त्या बिचारीवर तुटून पडला. कोणाचें कांहीं, कोणाचें कांहीं; ती आपली स्तब्ध थिजल्यासारखी उभी राहिली. जेव्हां गौरी-हराची पूजा करण्याविषयीं साऱ्या बायका तिला बोंचून बोंचून घेऊं लागल्या, तेव्हां ती अगदींच घाबरून जाऊन रडूं लागली. शेवटीं तशीच स्फुंदत स्फुंदत ती ह्मणाली "तुह्मी हवें तें बोला, मी ह्या मडक्याची आणि नारळाची पूजा साफ करावयाची नाहीं. तो देव नाहीं; मी कधीं मडक्याची प्रार्थना केली नाहीं. आमच्या शाळेंत ह्यापेक्षां मोठालीं मडकीं आहेत, त्यांत आह्मी पाणी मात्र ठेवितों. नारळ फोडून खातों. हें काय भलतेंच करायाला तुह्मी मला सांगतां?" पुढें तिला कांहीं सुचेना. ती तशीच त्यांच्यामध्यें उभी राहिली. जमलेल्या बायकांनीं आपली शिकस्त करून पाहिली. ती कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं कित्येक जणी, "चला ग असल्या हटवादी पोरीचें काय ऐकतां? खाईल उद्यां सासूची उठतां लाथ आणि बसतां बुक्की, तेव्हां येईल वाटेवर!" असें बोलून निघून गेल्या. आतां उपायच

नाहीं असें पाहून चंद्रीच्या काकूनेंच चंद्रीबद्दल गौरीहराची पूजा-अर्चा आटपून घेतली, व तो विधि पार पडला.

याप्रमाणेंच साऱ्या लग्नांत मासला उडाला. कन्यादानाच्या वेळेस, पुढें लाजाहोम, सप्तपदी वगैरे विधि होत असतां, कोठें नमस्कार, अर्थात् मूर्तीला नमस्कार करण्याची वेळ आली कीं, चंद्रीपुढें असाच अट्टहास करितां करितां, माणसांच्या नाकीं नऊं येत; पण तिनें मूर्तिपूजेचें पाप ह्मणून केलें नाहीं! पुष्कळ वेळां नवऱ्याच्या हाताला हात लावण्याची वेळ आली; पण त्या त्या प्रसंगीं, दुसऱ्या कोणी तरी तिचा हात बळेंच धरून, नवऱ्याच्या हाताला लावावा तेव्हां! लग्न पार पडेपर्यंत, व नंतरहि, ह्या पक्क्या सुधारलेल्या मुलीचें नांव त्या चाळींत व तेथून दहा पांच चाळींत, ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें. असो; याप्रमाणें व्हावयाचे ते शिष्टाचार होऊन, कसें तरी लग्न पार पडलें व बिचारी चंद्री गृहिणी बनली!

एक तर आपली मुलगी मिशनेरीच्या तावडींतून सुटून, तिचें आपल्या योजनेप्रमाणें लग्न झालें ह्मणून, चंद्रीच्या बापाला आनंद झाला! दुसरें या लग्नामुळें आपला बाळमित्र चिंतोपंत, आपला आतां व्याही झाला, ह्मणून ही त्याला दुधांत साखर पडल्याप्रमाणें वाटून समाधान झालें. या संबंधामुळें, चिंतोपंतालाहि थोडा आनंद झाला नाहीं. रखमाबाईला, ह्मणजे चंद्रीच्या सासूला मात्र, आपल्या कपाळीं असली हट्टाची पुतळी

सून होऊन आली ह्मणून फार वाईट वाटलें. तशांत ती लिहिणारी वाचणारी, त्यामुळें तिच्याकडे पाहिल्याबरोबर त्या जुन्या काळच्या बाईच्या कपाळाला सतरा आंठ्या पडत. चंद्रीच्या सुशिक्षित नवऱ्याला, झालेल्या प्रकारावरून बरीच गंमत वाटली. आपणास सुंदर, बुद्धिमान्, शिकली संवरलेली बायको मिळाली, याची त्याला मोठी धन्यता वाटूं लागली. पुष्कळ सुधारकांस अशिक्षित बायकांच्या त्रासामुळें, बाहेर एक व आंत एक असें वर्तन करावें लागतें, ती पाळी आतां आपणावर खरोखर येत नाहीं ह्या विश्वासानें तो फारच हर्षित झाला. चंद्री पोरच होती. तिला झालें त्याचें काय? किंवा पुढें होणाराचें काय? सारें सारखेंच.

पुढें चार पांच वर्षें, जशीं हिंदु मुलींचीं जात असतात तशीं चंद्रीचींहि गेलीं; अंतर इतकेंच कीं, शिवामूठ, मंगलागौरी, हरतालिका, वगैरे विवाहित स्त्रियांचीं व्रतें आलीं ह्मणजे मूर्तीला मान देण्यावांचून इतर सर्व गोष्टी, ती कधीं मौजेनें, कधीं जुलमानें करी! कारण त्या गोष्टींचा खरा अर्थ तिला समजत नसे. ह्या तिच्या धर्मलंडपणाबद्दल मात्र, तिला आपल्या सासूचा जाच फार सोसावा लागे. बाकी सारें सुरळीत चाललें होतें. तिचा सारा दिवस घरकामांत जाई. क्वचित् फुरसत मिळालीच, तर तिनें शेजारच्या समवयस्क मुलींत जाऊन खेळावें. संधि साधून एखादें छापील पुस्तक किंवा कागद, जें

हातीं लागेल तें ती मोठ्या उत्सुकतेनें वाची; मग तें समजो अथवा न समजो. आपल्या नवऱ्याचीं पुस्तकें वाचावीं असें तिला फार वाटे. पण पुस्तकें घरांत असलीं, ह्मणजे नवरा घरांत असावयाचा व बाहेर गेला ह्मणजे पुस्तकें घेऊन जायाचा; त्यामुळें तिचा बहुधा आशाभंगच होई. तशांत सुनेच्या हातांत पुस्तक पाहिलें कीं सासूनें आकाश पाताळ एक केलेंच! यामुळें तिला वाचायाची सदा चोरी होती. कामकाजांत ती हुशार व सुडसुडीत होती; त्यामुळें तिनें आपल्या आळशी व सासूपणाच्या गादीवर लोळणाऱ्या सासूची मर्जी तेंव्हांच संपादन केली असती! पण ती पक्की कर्मठ असल्यामुळें, व चंद्रीला मूर्तींपुढें, झाडापुढें, पशूंपुढें, व नारळसुपाऱ्यांपुढें, नाक घांसण्याचा पुराच कंटाळा असल्यामुळें, त्या दोघींचा सदा विळाभोंपळाच राहिला. ह्या स्थितींत राहिल्यामुळें तिच्या आंगच्या उदात्त गुणांचा व विचारस्वातंत्र्याचा, ऱ्हास होऊन ती खोटें बोलणारी, ठकविणारी व सांगकामी बनली. ह्या अवधींत प्रभु ख्रीस्ताचें नांव तिच्या कानीं कधींच पडलें नाहीं. त्याचें स्मरण तिला होतें, पण तें फार दिवसांपूर्वीं पाहिलेल्या स्वप्नासारखें होतें. नवल हें कीं, असल्या खोल अंधकूपांत पडलेल्या कोंकराकडेहि, त्या प्रेमळ मेंढपाळाची कृपादृष्टी होतीच. तो तिच्या नकळत तिला वागवीत होता. तिच्या सासूच्या अकांड तांडवामुळेंच तिच्या मनांत मूर्तिपूजेचा हिडीसपणा सदा

जागृत राहिला. व त्याच्या बरोबरच, देवाचें खरें स्वरूप तिच्या कोंवळ्या अंतःकरणांत, अधिकाधिक स्पष्ट होत गेलें.

तिला पंधरावें वर्ष लागतें आहे तोंच ती पत्नीत्वाच्या पुढें सरसावली; ह्मणजे तिला आईपण आलें. ह्या पुत्रजन्माचा घरांतल्या सर्व माणसांना आनंद झाला. चंद्रीच्या बापालाहि तसाच झाला असता, पण त्या सतरा पिंपळांवरच्या मुंजानें, एकदा लग्न करून दिल्यावर, आपण कोठें आहों याचा पत्ता सुद्धां कोणाला कळविला नाहीं! असो; बाळंत झाल्यापासून, चंद्री दिवस घटका मोजीत पडली होती; त्यामुळें तिला मात्र, त्या उत्सवाची दाद नव्हती. मुलाचें बारसेंवगैरे मोठ्या थाटानें झालें. बारसेंच काय? प्रत्येक महिन्याच्या वाढदिवसाला देखील, घरांत मोठा उत्सव होई. सारांश, या वेळापासून पुढें कित्येक महिने, सारें सुरळीत चाललें होतें. आतां वेल वाढीस लागला, या विचारानें रखमाबाई आनंदसागरांत केवळ पोंहूं लागली त्यामुळें तिच्या त्या पिरपिऱ्या स्वभावावर, एकाएकीं पडदा पड-ल्यासारखें झालें. ती त्या मुलाला जीव का प्राण करी. तिला वाटे कीं, हें मूल आपल्या आईच्या आंगचा नास्तिकपणा, चटसारा काढून टाकील. आपला बाळू चांगला, स्नानसंध्याशील, कडकडीत ब्राह्मण निपजणार ही तिच्या मनाची बालंबाल खात्री होती. मग आईचा स्वभाव पालटेलच.

मूल दिसण्यांत सुरेख व पाणीदार होतें. पण प्रकृतीनें मात्र

सदा झुरूमरू करणारें होतें. त्यानें आपल्या आईच्या मांडीवर, घटका घटका स्वस्थ पडून रहावें. बाळूला आईचा ळळा फार, ह्मणजे फारच होता. त्यामुळें घरकामांत चंद्रीचा पहिल्यासारखा उपयोग होत नसे. पण बाळूनें रखमाबाईला, असली मोहनी घातली होती कीं, आपल्या सुनेनें मुलाला घेऊन सासूसारखें बसावें, व आपण त्याकरितां सूनपणा पत्करावा, यांतच तिला मौज वाटूं लागली. चंद्री चांगली बरी होऊन, बाळूला कडेवर घेऊन इकडे तिकडे फिरूं लागल्यावर, एक दिवस सहज ती चाळीच्या सज्ज्यांत आली. तों तिच्या कानीं गाण्याचा सुस्वर पडला. लागलीच ती पुढें झाली, व पाहते तों शेवटच्या खोलींत, एक मडम आपल्या ओळखीचें, शाळा सुटल्यापासून आज सहा सात वर्षांत, ज्या गाण्यानें आपणास सोडिलें नाहीं, असें आपल्या अत्यंत आवडीचें गाणें ह्मणत आहे. तें ऐकून तिला आनंदाचें भरतें आलें; व ती तशीच बाळूला घेऊन गेली, आणि मडमेच्या मागें एका पोक्त बाईजवळ जाऊन बसली. तेथें सुमारें वीस बावीस बाया बसल्या होत्या; त्या सर्व मडमेचा उपदेश लक्ष्यपूर्वक ऐकत होत्या. कित्येक आपल्या बिऱ्हाडांतच दाराजवळ येऊन डोकावून पाहात होत्या. एक दिसण्यांत सुरेख बाई, दूर उभी राहून, मोठ्या तिरस्कारानें मडमेकडे पाहात होती. दुसरी एक दारांत बसून उगाच त्रास द्यावा या हेतूनें कांहीं तरी खडबड करीत

होती. एक आजीबाई घरांतून बाहेर येऊन मोठ्या दिमाखानें आपल्या सुनांना हांका मारून ह्मणाली, "टवळ्यांनो, काय आहे ग तुमचं तिकडे? येता का नाहीं घरांत?" त्याबरोबर दोघी तिघी तरुण मुली, खडबडून उठल्या; व झटकन् मडमेला सोडून, घरांत चालत्या झाल्या. मडमेनें गाणें संपविलें, व ती त्याचा अर्थ सांगूं लागली. तो ऐकत असतां चंद्रीचें बाळपण तिच्यापुढें मूर्तिमंत उभें राहून तिला शाळेंतील गोष्टींचें एकामागून एक स्मरण झालें. ही मडम दिसण्यांत आपल्या मडमेसारखी नाहीं, तथापि तिचा आवाज आपल्या मडमेसारखाच आहे, असें पक्कें भासून, चंद्रीचे दोन्ही डोळे गरंकन भरून आले. जमलेल्या मंडळींत बरींच मुलें आहेत असें पाहून, मडमेनें शास्त्रामधून "लेंकरांस अडवूं नका" ह्मणून ख्रिस्तानें जो शिष्यांस उपदेश केला आहे, तो वाचून दाखविला. व मुलांस जवळ घेऊन आशीर्वाद दिला. तें पाहून चंद्रीला अधिकच रडें कोसळलें; कारण शाळेंत असतां ही गोष्ट तिच्या ऐकण्यांत वारंवार येत असे. मडम ह्मणाली "लेंकरें ख्रिस्ताला किती आवडतात पाहिलें ना? अहाहा हीं सारीं लेंकरें, प्रभूकडे येतील तर किती बरें होईल?" आतां तर चंद्रीचा शोक पुरताच अनावर झाला. आपण शाळेंत आहों, आपली मडम असाच उपदेश करून, आपल्या डोक्यावर हात ठेवून, ह्मणत आहे कीं "चंद्रिके, तूं ख्रिस्ताचें कोंकरूं आहेस, ही

गोष्ट कधीं विसरूं नको," हा देखावा तिच्यापुढें येऊन, तिला हुंदक्यावर हुंदके येऊं लागले. आपल्यामागें कोणी तरी रडत आहे, असें लक्ष्यांत येतांच मडमेनें मागें पाहिलें व मोठ्या कळवळ्यानें चंद्रीला ह्मटलें "बाई काय झालें? कां रडतां?" चंद्रीचा कंठ भरून आला होता. तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना. ही अशी ओक्साबोक्शीं रडते कां, याचें इंगित जमलेल्या बायांच्या लक्ष्यांत येईना. त्यामुळें त्या मोठ्या विस्मयांत पडल्या, व आपापल्या परीनें, चंद्रीला नानाप्रकारचे प्रश्न करूं लागल्या. पण चंद्रीचें एक ना दोन. चालीप्रमाणें कित्येक बाया "बसा हो मडमसाहेब, जाल आतां, इतकी घाई कां?" ह्मणून मडमेला आग्रह करूं लागल्या, पण आतां यांचीं चित्तें ठिकाणीं नाहींत, आतां यांची कामाची वेळ झाली, हें जाणून मडमेनें त्यांची रजा घेतली. मडम जायाला निघाली तेव्हां, कित्येक जणींनीं "पुन्हा कधीं याल? लौकरच या" ह्मणून ह्मटलें. त्यावर मडमेनें, आणखीं आठा दिवसांनीं येईन, ह्मणून उत्तर दिल्यावर, तेंच नक्की ठरून ती गेली.

आपण इतक्या बायकांदेखत रडत सुटलों, याची चंद्रीच्या मनाला एकसारखी हुरहुर लागली. तसेंच मडम चांगली विचारीत असतां, आपण तिला त्याचें कारण सांगितलें नाहीं, व सोन्यासारखी संधि हातची घालविली, ह्मणून ही तिला चुटपुट लागली. तिचा तो आठवडा याच चिंतनांत गेला.

आठ दिवस गेले. नेमल्या दिवशीं, सर्वांच्या आधीं मडमेची व आपली भेट व्हावी ह्मणून, चंद्री जिन्याच्या तोंडाशीं जाऊन एकएक पळ मोजीत उभी राहिली. तिचें बिऱ्हाडच जिन्याच्या तोंडाशीं असल्यामुळें, तसें करणें तिला कठिण नव्हतें. कोणाच्या पावलाची चाहूल ऐकूं आली, कीं चंद्रीनें मोठ्या उत्कंठेनें पुढें डोकावून पाहावें. असें करितां करितां, एकदम मडमेचें तोंड तिच्या दृष्टीस पडलें, त्याबरोबर तिला एकदम हसूं आलें. कसें आलें, तें तिचें तिला मुळींच समजलें नाहीं. ती जिन्यांत आहे तोंच, चंद्रीनें "सलाम मडमसाहेब," ह्मणून तिचें स्वागत केलें. मडमेनें बाळकृष्णाचें चुंबन घेतलें, व कांहीं कुशल प्रश्न केल्यावर, चंद्रीला पहिल्या भेटीच्या वेळीं इतकें रडूं येण्याचें कारण काय ह्मणून विचारिलें. प्रथमतः चंद्रीला हिय्या होईना. पण बरेच आढेवेढे घेतल्यावर, व मडमेनें बरेंच उत्तेजन दिल्यावर, तिनें आपण ख्रिस्ती शाळेंत असून तेथून कोणत्या कारणानें व कशा येथें येऊन पडलों तें थोडक्यांत सांगितलें. चंद्रीला येशूची ओळख आहे, व निदान एका जीवंत देवाला सोडून ती मूर्तीपुढें इतकीं संकटें आलीं तरी कधीं वांकली नाहीं, हें ऐकून मडमेला फार संतोष वाटला; व ती ह्मणाली "बाई, येशूवर तुमची खरी प्रीति आहे काय? तुह्मी त्याच्या इच्छेप्रमाणें चालतां ना?" चंद्री ह्मणाली "येशू माझ्या स्मरणांतून गेला नाहीं, पण त्याची इच्छा ह्मणजे काय, ती कशी

आहे, हें मात्र मी विसरलें आहें. क्वचित् स्मरण झालेंच तरी माझ्या हातून तसें वागणें होत नाहीं." मडम ह्मणाली "बरें, मी दर आठव्या दिवशीं, तुह्मांला शिकवायाला येऊं का?" चंद्रीनें लागलेंच "हो! हो! या" ह्मणून ह्मटलें. पण इतक्यांत, ती चपापून ह्मणाली "नको बाई, माझी सासू काय ह्मणेल?" मडम ह्मणाली "विचारून पाहा आपल्या सासूबाईंना. चला आतां, तिकडे येतां ना? बाया माझी वाट पाहात असतील." त्या दिवशीं चंद्रीनें किती पण उत्कंठेनें मन लावून मडमेचा एक एक शब्द आपल्या अंतःकरणांत सांठवून ठेविला! मडमेपासून गीतांचें पुस्तक घेऊन तिनें तिला गाण्याचे कामांत इतकें साह्य केलें कीं, तें पाहून सर्वांना मोठा अचंबा वाटला. आधीं तिला वाचतां तरी येतें कीं नाहीं, हीच चाळींतल्या बायकांना शंका होती, त्यामुळें जी ती "वहावा ग झांकलें माणीक" ह्मणून तिच्या मागें लागली. हरवलेल्या पाडसाला पुन्हा हरिणी भेटावी, त्याप्रमाणें चंद्रीला झालें होतें. मडमेनें रजा घेतली तेव्हां, पुन्हा पुन्हा "लौकर या! आठच दिवस कशाला? चौथ्या दिवशींच याना? नाहीं तर उद्यां आलां ह्मणून काय झालें?" अशीं आर्जवें करून करून तिनें मडमेची पाठ पुरविली. बिचारीला हें काय ठाऊक कीं, आपल्यापुढें जवळच विघ्नें येऊन ठेपलीं आहेत?

चंद्रीचें हें मंगळागौरीचें पांचवें वर्ष होतें; अर्थात् शास्त्राप-

माणें या व्रताचें उद्यापन याच वर्षीं करणें उत्तम होय. हिंदू स्त्रियांच्या मागें उपास आणि व्रतें यांची इतकी गर्दी असते कीं, त्यांचीं नुसतीं नांवें देऊं ह्मटलें तर तो एक ग्रंथच होईल. पण त्या सर्व व्रतांत मंगळागौरी, हरतालिका, वटसावित्री, हीं व्रतें मुख्य होत. कारण यांचा संबंध सौभाग्याशीं आहे. सौभाग्य ह्मणजे नवऱ्याच्या पूर्वीं मरण येणें. सौभाग्य हेंच स्त्रीजन्माचें सार्थक्य! हें सार्थक्य करून देणाऱ्या व्रतांत, मंगळागौरीचें व्रत प्रमुख; असल्या व्रतास नाहीं ह्मणणें किंवा त्यांत टंगळमंगळ करणें ह्मणजे नुसता नास्तिकपणाच आहे असें नाहीं, तर जी स्त्री असें करील ती आपल्या नवऱ्याचा घात इच्छिणारी आहे, अशी हिंदू लोकांची समजूत आहे. "आधींच हौस त्यांत पडला पाऊस" ह्या ह्मणीप्रमाणें व्रतासंबंधानें चंद्रीच्या मनाची अवस्था झाली होती. मूर्तिपूजेचा तिला मुळचाच तिटकारा; त्यांत मडमेची गांठ पडून आणखी भर पडलेली, त्यामुळें जों जों व्रताचा दिवस जवळ येत चालला, तों तों तिचा जीव फारच विवंचनेंत पडूं लागला. तिनें एकांतीं आपल्या नवऱ्याला आपल्या मनाची स्थिति कशी झाली आहे तें सांगितलें; पण त्याचा उपयोग काय होणार तें तिला ठाऊकच होतें. चिंता आणि दुःख हीं कोणाजवळ तरी सांगितल्यानें अंमळ बरें वाटतें, याच हेतूनें तिनें आपल्या जन्माच्या मित्राजवळ मन मोकळें करून सर्व सांगितलें. नारायणरावानें

इतकेंच ह्मटलें "तुला योग्य वाटेल तसें तूं कर. मंगळागौरीच्या हातांत तुझें सौभाग्य आहे असें मला वाटत नाहीं. तुलाहि तसें वाटत नाहीं. मात्र मी या बाबतींत आईला कांहीं ह्मणणार नाहीं; व तुलाहि कांहीं ह्मणत नाहीं." मंगलागौरीचें व्रत ह्मणजे हिंदू स्त्रिया काय समजतात, असल्या व्रताचा भंग करणें म्हणजे स्त्रियांच्या आंगाचा कसा तिळपापड करणें आहे, आपल्या या वर्तनानें आपली सासू कशी चवताळून जाईल, व अलीकडे तिचें व आपलें जें इतकें सूत आहे, त्याचे एका क्षणांत कसे "एक घाव दोन तुकडे" होतील इत्यादि विचार मनांत आले ह्मणजे तिला "दे माय धरणी ठाय" होई. मूर्तिपूजेचें भयंकर पाप न करण्याच्या तिच्या निश्चयाची आणि असल्या विरुद्ध विचारांची तिच्या कोंवळ्या हृदयांत अगदीं हातघाईची लढाई जुंपली. पण सत्याच्या बाजूला देव असतो त्याच्या आशीर्वादानें सत्याचाच जय होतो. कांहीं होवो आपण मूर्तिपूजा करणार नाहीं; हाच निर्धार तिनें कायम केला. एकंदर लोकांच्या विरुद्ध जाणें ह्मणजे सामान्य गोष्ट नव्हे. ज्या देशांत, मोठमोठ्या मी मी ह्मणवून घेणाऱ्या सुधारकांस, रूढीपुढें खुशाल मान द्यावी लागत आहे त्या देशांत एखाद्या, चौदा पंधरा वर्षांच्या सासुरवासी पोरीनें तें धैर्य करणें ह्मणजे मोठें आश्चर्य आहे. यावरून एक

गोष्ट लक्ष्यांत येते कीं, चंद्रीच्या नकळत, देवाचा आत्मा तिला साह्य करित होता खचीत.

मंगळवार उजाडला, त्याबरोबर सासूसुनांचा कलहहि उदय पावला. प्रथमतः चंद्रीनें गोड बोलून, रखमाबाईची समजूत पाडण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण तो सर्व फुकट जाऊन ती पक्की कर्मठ बायको तिला नाहींनाहीं तें बोलत सुटली. नेहमींप्रमाणें चंद्रीनें तें सारेंच बोलणें सहन केलें नसतें, पण मडमेची गांठ पडल्यापासून, तिचा स्वभाव फार सहनशील झाला होता. किती बडबड केली तरी सूनबाई ऐकत नाहींत असें पाहून सासुबाईंना संतापवायु होण्याची वेळ आली. शेवटीं सुनेला तेथेंच सोडून सासूची स्वारी आपल्या नवऱ्यावर घसरली. आतां येथें उभें राहण्यांत शोभा नाहीं असें समजून नारायणराव ह्मणजे चंद्रीचा नवरा, काखेंत पुस्तक मारून चालता झाला. हा जुन्या चालीचा व नव्या मताचा झगडा पाहून, त्याला एक प्रकारची मौज वाटत होती. रखमाबाई मोठ्या संतापानें, चिंतोपंतापुढें हातवारे करून ह्मणाली "घ्या! आतां बांधा गळ्यांत ही सून! तरी मी सांगत होत्यें, ही पीडा आपल्या घरांत आणूं नका ह्मणून! कुळबुडवी, अवदसा कुठली!" चिंतोपंत शांतपणें ह्मणाले "तुला शंभर वेळां सांगितलें हिला कां घरांत आणिलें तें. जा आतां; फार शहाणपणा करूं नको. असला कल्होळ माजवून कामें होत नसतात. पाहा, मी आतां तिची

समजूत करितों." "बरें, पाहूं काय होतें तें" असें ह्मणून रखमाबाई दण दण दण पाय आपटीत तेथून दूर गेली. नंतर चिंतोपंतानें चंद्रीला जवळ बोलाविलें; आणि होईल तितकें करून तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. ती प्रथमत: संताप व दु:ख यांनीं वेडावल्यासारखी दिसत होती. पण सासऱ्याचें मायाळूपणाचें बोलणें ऐकून, तिला समाधान वाटलें. सासूच्या जाचामुळें चंद्रीच्या स्वभावांत थोडासा त्रासिकपणा आला होता, तरी जात्या ती मुलगी फार कोंवळ्या मनाची व मायाळू होती. त्यामुळें सासऱ्याचें ममतेचें वर्तन पाहून ती त्याच्यावर ममता करीत असे. एक तर ती आपल्या बाळमित्राची मुलगी, तशांत सुंदर व चतुर, शिवाय तिचें व आपल्या मुलाचें नि:सीम प्रेम, त्यामुळें चिंतोपंताला ती खरोखरच आवडत असे. तो तिच्या सुधारलेल्या मताला, रखमाबाईइतकें महत्व देत नसे. कारण आपले चिरंजीव त्याच मार्गाला असून, आपण किती केलें तरी आपल्या मागें हीं दोघें आपल्या आचारांवर पाणी सोडून, मोकळीं होणार ही त्याच्या जिवाची पक्की खातरी होती. चंद्रीला मूर्तिपूजा ह्मणजे महत्पाप वाटे; पण तें कां हें सांगण्याची तयारी तिची नव्हती. तथापि तिनें तेथल्या तेथें विचार करून, जीं कारणें सांगितलीं तीं ऐकून तिच्या सासऱ्याला तिच्या कुशाग्र बुद्धीचें मोठें आश्चर्य वाटलें. बाळपणापासून मूर्तिपूजेचें भयंकर स्वरूप हिच्या मनावर ठसलें आहे, तें आतां कांहीं केलें तरी

पुसून टाकितां येणार नाहीं; तसेंच विरोधानें हार जाणारा हिचा स्वभाव नसून, अधिक पेट घेणारा मात्र आहे, हें ध्यानांत येऊन चिंतोपंत ह्मणाले, "हें पाहा, एवढा आजचा दिवस साजरा कर. इतका खर्च करून लोकांत आपलें हसें व्हावें, हें तुला तरी आवडतें का? माझी शहाणी बाई ती! एवढा दिवस झाला ह्मणजे मग तुला कोणी कांहीं ह्मणणार नाहीं, मग तूं खुशाल तुला योग्य दिसेल तशी वाग. जा तर."

आपल्या उपदेशाचा कितपत उपयोग होईल हें समजूनच कीं काय, चिंतोपंतानें आंगरखा पागोटें चढविलें व तेथून पाय काढिला. रखमाबाईला वाटलें होतें कीं, गोड बोलून शुद्धीवर न आली तर आपला नवरा सुनेला चांगलीच मात्रा चारील; पण तसें कांहींच झालें नाहीं, हें पाहून तिच्या आंगाची नुसती लाही झाली. "ही दळभद्री, पांढऱ्या पायांची अक्काबाई, लौकरच साऱ्या घरादाराचें वाटोळें करणार; रोज उठून कटकट, कोणतें का शुभकार्य असेना, हिचा आपला तिसराच पंथ, खरोखर ही आपल्या घरावर लौकरच विघ्न आणणार!" असें जें तोंडास येईल तें ती बकत सुटली. तरी चंद्रीनें हूं का चूं देखील केलें नाहीं. नेहमीं चंद्री सासूच्या तोंडास तोंड देत असे, पण आज तिनें पक्कें मौनव्रत धारण केलें होतें; त्यामुळें तिच्या सासूच्या वक्तृत्वाला उत्तेजन मिळण्याचें कमी पडून, ती इतकी भडकली कीं ती देहभान विसरून, चंद्रीच्या आंगावर धांवून गेली!

त्याबरोबर चंद्रीच्या आंगाचा थरकांप होऊन, तिनें मोठ्यानें किंकाळी फोडिली. भयामुळें पुढें दरवाजा उघडा असूनही, तिचा पाय जागचा हालेना. सासूनें तिचे दोन्ही हात धरून, तिच्यावर लाथाबुक्यांचा भडिमार सुरू केला. तिनें तिला बेदम मारिलें असतें, पण इतक्यांत तिचा नवरा एकदम बाहेरून घरांत आला व "आई, हात आटप" ह्मणून कांहीं रागानें, कांहीं गंभीरपणानें रखमाबाईकडे पाहूं लागला. रखमाबाई सुनेला सोडून लेंकाकडे वळली; व करकर दांत खाऊन ह्मणाली, "चल नीघ येथून! मोठा आला आहे बायकोचा कैवार घ्यायाला! मेल्यांनो कांहीं लाजलज्जा तरी?" इतकें बोलून तिनें पुन्हा चंद्रीकडे मोर्चा फिरविला. नारायणराव लागलाच त्या दोघींच्या मध्यें आईकडे तोंड करून उभा राहिला. तो ह्मणाला "आई, तुला मी एकदा सांगून ठेवतों कीं, हें मला अगदीं खपायाचें नाहीं. पुन्हा जर असा हात उचलशील तर–"

"काय करणार रे तूं माझें?" रखमाबाई इतकेंच बोलून लेंकाकडे मोठ्या रागानें पाहात राहिली. नारायणराव ह्मणाला, "तुझें काय करायाचें आहे आणि तिचें काय करायाचें आहे? मग जें होईल तें तूं पाहाशीलच." रखमाबाई पक्की तोंडाळ खरी; पण या वेळेस तिला फारसें बोलवेना. तिच्या मुलानें आजपर्यंत कधीं तिला अवाक्षर ह्मटलें नव्हतें, तशांत तो जसा गंभीर दिसे तसाच निश्चयाचा पक्का होता हें तिला ठाऊक होतें. हा

एकदा बिथरला तर काय करील याचा नेम नाहीं, हें ती जाणून होती. तरी मी तुझ्या पुढें दबलें असें दाखविणें हें त्या सासूपणाच्या गादीवर बसलेल्या, राजाधिराजाला बरें वाटलें नाहीं. ती ह्मणाली, "कर काय करतोस तें; हिचा नास्तिकपणा काढून टाकीन तरच मी रखमाबाई खरी! नुसती वठणीस न आली तर चवदावें रत्न आहेच!" हें ऐकून नारायणराव ह्मणाला, "फार चांगलें, आह्मी उभयतां जाऊन ख्रिस्ती होतों, ह्मणजे सुटलीस!" ह्या अंजनानें मात्र रखमाबाईचे डोळे उघडिले. नारायणराव उगाच कांहीं तरी बोलून जाणारा मनुष्य नव्हता; तो जें बोलेल तें खास करील, हें तिला ठाऊक होतें. ती लागलीच ह्मणाली "जा बाबा, पाहिजे तशीं नाचा! काय आतां दहा गेलीं पांच राहिलीं? मला करायाचें आहे काय? खुशाल हवा तसा गोंधळ घाला. सारीं सारखीं, मग मीच कशाला वांकडी होऊं? ख्रिस्ती होऊं नका, आणि फिस्ती होऊं नका, मीच आपलें कोठें तरी काळें करितें." अशी बडबड करीत, हात पाय आपटीत, ती तेथून निघून स्वयंपाकघरांत गेली. सासू गेली असें पाहून चंद्री हसून नवऱ्याला ह्मणते, "खरेंच कां आपल्याला ख्रिस्ती व्हायाचें? कधीं? कधीं? सांगा गडे!" त्यानें किंचित् हसून ह्मटलें "काय पण आतुर झाली आहे बाटायाला!" चंद्री ह्मणाली "बाटायाला? बाटणें ह्मणजे काय? ख्रिस्ती झाल्यानें का कोणी बाटतें? मला तर वाटतें कीं त्यानें

मनुष्य अधिक चांगला होतो." यावर नारायणराव ह्मणाला, "पुरे आतां व्याख्यान! उगीच आईला त्रास देऊं नको पुन्हा असा." चंद्री ह्मणाली, "नाहीं, मी त्यांना कधीं बरें त्रास देतें?" नारायणराव—"एकून हें त्रास देणें नव्हेच? बरें आज मी तुझ्याकरितां दोन फार सुरेख पुस्तकें आणिलीं आहेत, मग देईन मी तीं तुला." चंद्री—"आपण मला नवा करार आणि गीतें देण्याचें कबूल केलें होतें, आठवण आहे का?" नारायणराव—"तींच पुस्तकें आणिलीं आहेत; मात्र तीं उद्यां मिळतील." इतकें बोलणें होऊन चंद्री घरांत गेली; व नारायणराव आपल्या अभ्यासाच्या खोलींत जाऊन नवा करारच हातांत घेऊन, सचिंत बसला.

आपल्या नवऱ्याचें आजचें सारेंच वर्तन फार निराळ्या धोरणावर आहे हें लक्षांत येऊन चंद्रीचा आनंद गगनीं मावेना. आजपर्यंत चंद्रीला वाटत होतें कीं, आपला नवरा धर्माच्या बाबतींत केवळ उदासीन आहे; व त्याचा कल धर्माशिवाय इतर सुधारणेकडे आहे. पण खरोखर तसें नव्हतें. तो इंग्रजी शिकूं लागल्यापासून, एका मिशनस्कुलांत होता. त्यामुळें आज पांच सहा वर्षें पवित्रशास्त्राचा लाभ त्याला रोज घडत होता. त्यामुळें त्याच्या लक्ष्यांत न आलें तरी त्याच्या मनावर ख्रिस्ती धर्म आपली छाप बसवीत होता. त्यांत घरीं त्याच्या बायकोच्या वर्तनाची एकसारखी भर पडत होतीच. तो

अलीकडे अलीकडे मनापासून शास्त्राचा अभ्यास करीत असे. विशेषतः मूर्तिपूजा पाप कां या विषयाचा अभ्यास त्यानें फारच बारकाईनें केला होता. तेणेंकरून असल्या विषयाच्या आनुषंगिक विषयांकडे, त्याचें लक्ष्य जाऊन ख्रिस्ती धर्माच्या बहुतेक मतांचा त्याला बोध झाला होता. तो अंतःकरणानें ख्रिस्ती झाला होता, तथापि जात सोडण्याची त्याची तयारी नव्हती. ह्मणजे बहुतेक सर्व लोकांप्रमाणें देवापेक्षां व सत्यापेक्षां मनुष्याला व रूढीला तो अधिक किंमत देत होता. आपली बायको आपणास जें सत्य वाटतें त्याचा मान राखण्यासाठीं किती त्रास सोशीत आहे, हें पाहून त्याला वारंवार स्वतःविषयीं लाज वाटे. आपल्या मनाचा झालेला पालट तिला एकदा कळूं दिला ह्मणजे तिच्या स्वभावास अनुसरून ती आपणास चैन पडूं देणार नाहीं हें समजूनच तो तिला आजपर्यंत उदासीनपणा दाखवीत होता. पण असें किती दिवस चालणार?

बापलेंकांनीं तो दिवस बहुतेक बाहेर राहूनच घालविला. नाहीं ह्मणायाला जेवणापुरते मात्र ते घरीं आले होते. आपल्या नवऱ्याचा कल ख्रिस्ती धर्माकडे आहे, हें समजून चंद्रीला पुष्कळ उमेद आली; व त्यामुळें सकाळीं बसलेल्या माराची देखील विस्मृति पडून, ती दिवसभर मोठ्या आनंदांत होती. ती सर्वांशीं मोठ्या प्रेमानें वागून हरएक कामांत आपल्या सासूला मदत करीत होती. तिच्या ह्या आनंदवृत्तीचें कारण समजून,

तिची सासू मात्र अधिकच फुगून बसली होती. सारा दिवस तिची धुसपूस आणि पिरपीर चालूच होती. तरी बायका जमल्यावर तिनें बराच शांतपणा धारण केला. झालेला प्रकार कोणाच्या लक्ष्यांत येऊं नये ह्मणून, ती फार फार जपली. "काय करावें बाई! इतकी तयारी करून, आयत्या वेळेस पुण्याहून दिराचें पत्र आलें कीं त्यांना मुलगा झाला; आतां सोहेरामध्यें मंगळागौरीची पूजा कशी करावी? खरें ह्मटलें तर सूनबाईचें हें मंगळागौरीचें शेवटचें वर्ष; पण आतां इलाज नाहीं. तुह्मी पूजा करून घ्या, देवीला सगळें समजतें आहे!" अशी थाप मारून वेळ साधून नेण्याचा तिनें प्रयत्न केला. चावडीवर मारिलें आणि गांवांत सांगूं नका, अशांतला रखमाबाईचा हा उपक्रम पाहून, कित्येक बायकांना हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. आणि असलें गालांतले गालांत येणारें तें हसूं ह्मणजे हलकें सलकें नाहीं; हजार बाणांना त्याची सर येणार नाहीं! पण रखमाबाईला कोणी कांहीं बोललें नाहीं. पूजा तर पार पडली. पण आरती ह्मणजे एखादें स्तुतिपर गाणें ह्मणून देवाभोंवतीं दुरून दिवा ओंवाळायाचा, हें करण्यास तरी तिला हरकत नव्हती. निदान तेवढ्यापुरतें तिनें यावें, ह्मणून बायका आग्रह करितील, हें समजून ती वेळ येतांच रखमाबाईनें कांहीं तरी निमित्त काढून, चंद्रीला बाहेर पाठविलें. बायांच्या लक्ष्यांत ती खुबी आली; व त्यांनीं आपसांत थोडीशी कुजबुज केल्यावर

एक बाई ह्मणाली, "काय झालें अंमळ थांबलांत तर! घटकेचा कांहीं प्रहर होत नाहीं. पूजा नाहीं तर नाहीं. आरतीला तरी चंद्रिकाबाईना यायला हरकत नाहींना? येऊं द्या तर त्यांना." आपण किती छपविलें तरी व्यर्थ; ह्या बायका आपली फजिती करणारच करणार, असें पाहतांच रखमाबाई देहभान विसरून चंद्रीला शिव्या देऊन ह्मणाली "जळली मेली ती कारटी! गेली चुलींत! तुह्मांला काय करायाचें तें करून घ्या. तिच्या आणि तिच्या बरोबर आमच्या कपाळांत काय लिहिलें आहे, तें मला पक्कें समजून चुकलें आहे." असें ह्मणून तिनें गळा काढिला. बिचाऱ्या बाया, लागल्याच स्तब्ध होऊन, त्यांनीं पुढले सर्व विधि मुकाट्यानें करून टाकिले.

या गोष्टीला तीन दिवस झाल्यावर चौथ्या दिवशीं संध्याकाळीं चिंतोपंत नेहमींप्रमाणें पायीं यावयाचे ते गाडींत बसून घरीं आले. त्याबरोबर रखमाबाईच्या पोटांत धस्स होऊन ती धड धड जिना उतरून खालीं गेली. लागलाच नारायणरावही, आईच्या मागें धांवतच खालीं गेला. पाहातात तों चिंतोपंत तापानें फणफणून जाऊन, गाडींत पडला आहे. बिचाऱ्याच्या आंगांत त्राण मुळींच उरलें नव्हतें. त्या दोघांनीं त्याला धरून वर आणिलें. हा मंगळागौरीचा शाप, आपणास भोंवला असें वाटून रखमाबाईनें, चंद्रीला सुखाचा घांस असा खाऊं दिला नाहीं. चिंतोपंताला नुसता हिंवताप आला होता. तो पांच

सहा दिवसांनीं, बरा होऊन पुन्हा कामावर जाऊं लागला. पण याचें श्रेय वैद्याला किंवा औषधाला न देतां रखमाबाई ह्मणे "मी देवीपुढें नाकें घांसलीं, इतके नवस केले ह्मणूनच हें विघ्न टळलें." या नवसांत, श्रावणांतले चार, व आश्विनांतले चार असे आठ मंगळवार चंद्री कडकडीत करील; ह्मणजे दांताला दांत लावून उपाशीं राहील, असाही एक नवस तिनें केला होता!

असो; आज नाहीं उद्यां, मरण कोणाला चुकलें आहे? चिंतोपंत लौकरच पुन्हा आजारी पडले ते पुन्हा उठले नाहींत. त्यांना हा जो प्रथमतः हिंवताप आला तो त्यांच्या आंगांतून समूळ कधींच गेला नाहीं. ते दिवसानुदिवस थकत जाऊन सहा महिन्यांनीं अंथरुणाला खिळले. शेवटींशेवटीं कोणतेंच काम होईना तेव्हां ते चंद्रीला कांहीं तरी वाचायाला सांगत. चंद्रीनें शास्त्रांतून कांहीं भाग, एखादें गीत किंवा मडमेनें दिलेलीं लहान लहान पुस्तकें व पत्रकें त्यांना वाचून दाखवावीं. चिंतोपंतांनीं तिला कधीं नको ह्मटलें नाहीं, अगर वादविवाद केला नाहीं. एक दिवस तिनें त्यांना "आत्मारामपंत व मृत्यु शिपाई" हें पुस्तक वाचून दाखविलें. तें ऐकत असतां चिंतोपंत कोणत्या तरी गहन विचारांत पडल्यासारखे दिसूं लागले. सर्व पुस्तक संपल्यावर त्यांनीं तें पुन्हा वाचायास सांगितलें. अशीं त्या पुस्तकाचीं तीन वाचनें झालीं. आपल्या सासऱ्याच्या

मनाची स्थिति ध्यानांत येऊन चंद्रीनें शास्त्रांतून १ करिंथ १९ हा भाग त्याला वाचून दाखविला. चिंतोपंतांनीं एकदम डोळे उघडून वर आकाशाकडे पाहिलें; व नंतर चंद्रीकडे दृष्टि केली. त्या दृष्टींत काय नव्हतें? आश्चर्य होतें, आनंद होता, आशा होती, चंद्रीविषयीं सत्कारबुद्धि होती. ह्या वेळेपासून पुढें चिंतोपंतास पवित्रशास्त्राचें ज्ञान अधिक करून घ्यावेंसें वाटूं लागलें. त्यांनीं चंद्रीच्या द्वारा मडमेची गांठ घेतली. पुढें त्यांची व एका चांगल्या धार्मिक मिशनेरीची ओळख झाली. पण इतकें होईपर्यंत रखमाबाई कोठें होती? तेथेंच नवऱ्याच्या उशाशीं बसलेली होती; पण निराशा व दुःख यांनीं तिचें चलनवलनच बंद पडल्यासारखें झालें होतें. सून, मुलगा व आतां प्रत्यक्ष नवराच ख्रिस्ती धर्माकडे धाव मारीत आहे, हें पाहून तिची कंबरच बसली होती, व पक्क्या दैववादी मनुष्यास शोभेल, असाच तिच्या वृत्तींत फरक पडला होता. दिवसानुदिवस चिंतोपंत फारच खंगत चालले. आतां आपण वांचत नाहीं, अशी त्यांच्या जिवाची पक्की खातरी झाली. मनाचा पालट होण्याची खरी वेळ हीच होय. त्यांचें वय सुमारें साठ वर्षांचें होतें. हीं साठ वर्षें त्यांच्या समोर, लहानशा नकाशासारखीं उभीं राहात. सगळ्या हयातींत हातून घडलेल्या बऱ्यावाईट गोष्टी त्यांच्या पुढें येऊन जणूं काय बोलूं लागत. त्यामुळें आजपर्यंत, ज्या एका विषयाविषयीं स्वप्नांत सुद्धां त्यांनीं कधीं विचार केला

नव्हता, तो आतां त्यांना क्षणभरही सोडीनासा झाला. ह्मणजे मरणोत्तर आपलें काय होणार, ही विवंचना एकसारखी त्यांच्या पाठीमागें लागली. आपण पापी आहों याबद्दल त्यांना आतां शंका अशी उरली नाहीं. प्रभु ख्रिस्तानें मात्र आपल्या पापाचा दंड सोसून, आपणास मुक्त केलें आहे. आपण आतां मनुष्य नाहीं, दास नाहीं, तर देवाचे पुत्र आहों, आपण ख्रिस्तामध्यें पुन्हा उठूं, देहत्याग ह्मणजे मरण नव्हे, इत्यादि आशाजनक तत्वें, त्या निराशेंत बुडूं पाहाणाऱ्या आत्म्यानें तेव्हांच उचलून उराशीं धरिलीं. सारांश चिंतोपंत मरणापूर्वीं, पूर्णपणें ख्रिस्ती झाले! त्यांचा बाप्तिस्मा व्हावा, परंतु वृद्ध व क्षीण मनुष्याचा प्राण कसा एकाएकीं निघून जातो तें कळत नाहीं. त्याप्रमाणेंच चिंतोपंतांचें झालें. रखमाबाईचें कपाळ फुटलें. तिच्या मताप्रमाणें तिचा देव, मालक, तिच्या जन्माचा अर्थ तिला सदाचा सोडून गेला. तिनें रडून रडून आकांत केला. प्रत्यक्ष नरकवास पुरवला पण वैधव्य नको! विधवा ह्मणजे अशुभाची चालती बोलती प्रतिमा, दुर्दैवाचा अवतार, घोर पापाची परिणति, अशी लोकांची समजूत, व तदनुसार वर्तन असल्यामुळें वैधव्य येणें यासारखें दुसरें अरिष्ट नाहीं, असें या देशांतील स्त्रियांस वाटतें. नवरा मेल्याबरोबर, बायको दुःखानें वेडावून जावी हें साहजिक आहे. अशा प्रसंगीं तिच्या मनाचें समाधान होईल ते ते उपाय इष्ट मित्रांनीं करावे, हेंहि तसेंच साहजिक आहे. पण

उपयोग काय? जातीपुढें व रूढीपुढें, प्रत्यक्ष आईबाप देखील आपल्या विधवा मुलीच्या हृदयांत चेतलेल्या विस्तवावर तेलाची धार धरितात. ब्राह्मणांमध्यें तर, नवऱ्याच्या प्रेताबरोबर त्याच्या बायकोचा केशकलाप कापून नेऊन, चितेंत टाकिला पाहिजे ! तसें न केलें तर त्या मृतास अधोगति प्राप्त व्हावयाची ! इकडे नवऱ्याचें प्राणोत्क्रमण झालें रे झालें कीं तिकडे बायकोनें बांगड्या फोडून, कुंकू पुसून, मंगळसूत्र तोडून, मोकळें झालें पाहिजे. पहिलीं वस्त्रें टाकून दुसरीं पांढरीं किंवा तांबडीं वस्त्रें नेसलीं पाहिजेत. पुढें निदान बारा महिने तरी, तिनें कोणास तोंड न दाखवितां अंधारांत बसलें पाहिजे, नुसत्या घोंगडीवर निजलें पाहिजे, सदा एकभुक्त राहिलें पाहिजे. महिन्यांतून सात आठ दहा, उपास केले पाहिजेत! एक का दोन? वैधव्याच्या पहिल्या दिवसापासून, पहिल्याच वर्षांत विधवेचे जे हाल, जो अपमान, व जी विटंबना होत असते, त्याची नुसती कल्पना केली कीं, आंगावर कांटा उभा राहतो. इतर लोक असोत; विधवेच्या आईबापांस, भावांबहिणींस, मुलाबाळांस तिचे कसे असे हाल करवतात? काय करणार बिचारे? रूढीच्या या दैववादी व धर्मभोळ्या दासांस हें सारें एकीकडे रडत करावें लागतें! प्रत्यक्ष विधवेला देखील त्या सर्व गोष्टी निमूटपणें सोसून घेणें हाच परम धर्म, हेंच खरें पातिव्रत्य असें वाटत असतें. रखमाबाईचें तसेंच होतें. मुलाला

व सुनेला, तिची कींव येई; व तिचें दुःख कमी करण्याचा तीं दोघें फार प्रयत्न करीत. पण एक तर पक्की कर्मठ; दुसरें आपणावर ही जी आकाशींची कुऱ्हाड कोसळली, ती चंद्रीच्या नास्तिकपणामुळेंच कोसळली, अशी तिची कल्पना, यामुळें त्यांच्या पुढें पुढें करण्यानें, ती अधिकच चवताळून जाई. तरी त्या दोघांनीं आपल्या कर्तव्यांत अंतर पडूं दिलें नाहीं. रखमाबाईची स्थिति फारच विलक्षण झाली. तिनें रात्रंदिवस घरांत कोठें तरी पडून रडत असावें. चंद्री तर तिला दृष्टीसमोर नकोशी झाली. आपणास ज्याचा राग, त्याचा आपल्या मुलासही राग असावा या इच्छेचा भंग झाल्यामुळें, नारायणरावावर सुद्धां ती रुसलेलीच होती. नातवाला ती जीव कीं प्राण करीत असे, पण त्याचें देखील तिला कौतुक वाटेना. त्यांचें घर इतकें उदास दिसूं लागलें कीं सांगतां येत नाहीं. सारांश त्यांचें तें वर्ष फारच वाईट रीतीनें पार पडलें. सासूची ही अशी शोचनीय स्थिति झाली नसती, तर त्यांचें तें वर्ष मोठ्या आनंदानें गेलें असतें. कारण बाळकृष्णा आतां बराच मोठा होऊन आंगींपिंडीं सांवरला होता; त्याचें बोबडें बोलणें, चालणें, पाहून क्षणोक्षणीं चंद्रीच्या मनांत प्रेमाला पूर येई; नारायणरावही दिवसानुदिवस, तिच्या चांगलाच कह्यांत येत होता; ह्मणजे तिच्या संसारसुखाचा परमावधिच होत होता ह्मणावयाचा; तशांत तो, अलीकडे पवित्रशास्त्र हातांत घेऊन मनन करीत बसे, चंद्रीबरोबर धर्मसंबंधानें चर्चा करी, तिच्या

मडमेशीं अधिक स्नेहानें वागे, त्यामुळें तर तिला फारच आनंद होई. मडमही अलीकडे नेमानें येऊन, तिला मोठ्या आस्थेनें आत्मिक अन्न भरवी. सारांश, तिच्या सासूची अशी दुर्दशा झाली नसती, तर तिच्या सुखाला पारावार राहिला नसता. त्या दोघांना वाटे कीं एकदा वर्ष पुरें होऊन म्हातारी बाहेर हिंडूं फिरूं लागली म्हणजे, तिची वृत्ति निवळेल. पण व्यर्थ; आतां ती पहिल्यासारखी वसा वसा करीत नसे खरी, पण एक तर "होतें कसें आणि झालें कसें" हा हृद्रोग तिला लागला होता, व दुसरें आपली सून आपल्या मुलाला घेऊन एक दिवस खरोखर बाटणार, अशी तिची बालंबाल खात्री झाल्यामुळें तिला चंद्री म्हणजे दुस्मानासारखी दिसत होती. जेव्हां पाहावें तेव्हां ती आपली फुगलेली दिसे. केव्हां केव्हां तिनें कपाळाला आंठ्या घालून, मोठ्या विवंचनेंत पडल्यासारखें बसावें व मध्येंच समाधान झाल्यासारखें करून, मान डोलवून चुटकी वाजवावी. मनांतल्या मनांत ती कसले बेत करीत होती कोणाला ठाऊक! क्षणभर भ्रमिष्टासारखें दिसणें, मध्येंच समाधानाचें हसूं येणें, पुन्हा मुद्रा द्राष्ट होणें, इत्यादि प्रकारांवरून रखमाबाईच्या मनांत कसला तरी भयंकर हेतु घोळत होता, यांत संशय नाहीं. पण जिला जग म्हणजे काय तें घराच्या चार भिंती, त्या चंद्रीच्या लक्ष्यांत तें कसें येणार? ती आपली खुशाल संसार करीत होती. एक दिवस तिची मडम तिला सहज गाडींत बसून फिरायाला

येता का ह्मणून विचारूं लागली. चंद्री तेव्हांच हो ह्मणाली; पण सासूला विचारल्यावांचून जावें कसें, हा विचार मनांत येऊन ती पुन्हा ह्मणाली "थांबा पण; मी सासूबाईंना विचारून येतें. सासू आपल्याला जाऊं देईल, अशी चंद्रीला मुळींच आशा नव्हती. ती भीत भीतच तिच्या जवळ गेली. पण आश्चर्य हें कीं, सासूबाईंनीं अगदीं आढेवेढे न घेतां, एकदम तिला जा ह्मणून सांगितलें. तिचा मुलगा निजला होता, त्याला उद्देशून ती ह्मणाली "जा, पण मुलगा उठायाच्या बेताला परत ये; मी देहभानावर नाहीं, तशांत मूल पडलें चपळ, पटकन् कोठें जाईल याचा नेम नाहीं; मग माझ्या माथ्यावर अपेश नको. एखाद्या धूर्त मनुष्याच्या मनाला, इतक्या बोलण्यावरूनच संशय आला असता; पण चंद्रीला त्याचें कांहीं वाटलें नाहीं; व ती मडमेबरोबर निघून गेली. मुंबईस रोजगाऱ्यांच्या बायकांची चार गप्पाछप्पा मारण्याची वेळ ह्मणजे, दुपारीं तीन वाजल्यापासून पांच वाजतपावेतों. एकदा पांच वाजले कीं त्यांच्यावर चुलीचें पकडसमान सुटलेंच. चंद्री गेली त्या वेळेस चाळींतील गडबड बहुतेक कमी झाली होती. ती गेल्याबरोबर ह्मातारी निघून कोठेंशी गेली; पाव घटकेंत एक वृद्ध गृहस्थ बगी घेऊन आला; ह्मातारी त्याला घेऊन घरांत आली. पुन्हा तीं इकडे तिकडे पाहात पाहात, पटकन् बगीकडे गेलीं, ह्मातारा बगींत बसला व भरधाव चालता झाला. रखमाबाई घरांत आली, व गदगदां हसून

ह्मणाली "जा मेल्यांनो, आतां खुशाल बाटा! माझा वंशवेल मीं कायम ठेवला! जा आतां करा हवें तें!" इतका प्रकार होईपर्यंत पुरता अर्धा तासही गेला नाहीं. आणखी अर्ध्या तासानें चंद्री घरीं आली. आईच ती! तिनें येतां क्षणीं मुलाच्या पाळण्याकडे धाव मारिली. पाहाते तों, पाळण्यांत मुलगा नाहीं. मग काय विचारितां? तिच्या पोटांत धस्स झालें, कमर खचली, हातपाय गळून गेले; रखमाबाई दरवाजा उघडा टाकून, एका कोंपऱ्यांत झोंपेचें सोंग घेऊन घोरत पडली होती, जणुं काय ती मध्यरात्र असून तिला साता रात्रींचें जागरण झालें होतें. चंद्री ओक्साबोक्शीं रडत सुटली, तेव्हां ती दचकल्यासारखें करून उठली व "काय झालें ग?" ह्मणून तिला विचारूं लागली. मुलगा दिसत नाहीं हें समजतांच, चंद्रीचा शोक कांहींच नाहीं, असला आकांत तिनें मांडिला. विशेष हें कीं, चंद्रीला मुळींच दोष न देतां "कशी ग मला अवदसेला काळझोंप लागली ही!" ह्मणून आपणालाच नाहीं नाहीं तें बोलून हेल काढून ती रडत सुटली. चंद्री तेथें मुळींच उभी राहिली नाहीं. ती कावऱ्याबावऱ्यासारखी होऊन चाळभर आपल्या मुलाला शोधूं लागली. एक एक ठिकाण तिनें तीनतीनदां पाहिलें. तिनें एकावर एक किती माणसें नारायणरावाला बोलावण्याकरितां पाठविलीं असतील, त्यांना गणती नाहीं. नारायणरावाचा त्या मुलावर फारच जीव होता; तो धावतच घरीं आला. पुरुषा-

सारखा पुरुष तो, पण त्याचेहि डोळे खळकन् भरून आले व जो गहिंवर आला तो कांहीं केल्या त्याला आवरेना. पण ही रडत बसायाची वेळ नव्हती. हां हां ह्मणतां त्याचे पुष्कळ मित्र जमा झाले व ज्याला जशी कल्पना सुचेल, त्याप्रमाणें सर्वजण त्या मुलाचा शोध करूं लागले. पोलिसाला वर्दी दिली, बक्षीस लाविलें, सारें केलें! काय होतें तें पाहावें, ह्यावांचून करायाचें कांहीं ठेविलें नाहीं.

सारांश, चंद्री सुखाच्या पर्वतावरून दुःखाच्या खोल दरींत अचानक कोसळली. हिनें गाडीघोडे उडवायाच्या भरीं पडून पोटचें पोर घालविलें असें समजून नारायणराव तिच्याशीं रागारागानें तुटक वागूं लागला. तिची सासू ऊठपळ तिला भलतेसलते टोमणे मारूं लागली. ही वरून तेलाची धार पडत होती; आंतून पुत्रशोकाचा वणवा पेटला होता तो होताच. आश्चर्य हें कीं, तिची सासू मात्र आतां चांगली आनंदी दिसूं लागली. तिच्यांत झालेला हा फरक पाहून चंद्रीला एखादे वेळेस तिच्या विघ्नसंतोषीपणाचा फार राग येई; पण एखादे वेळेस असेंहि वाटे कीं, मुलगा खरोखरच नाहींसा झाला असता तर ही अशी आनंदी कधींच दिसली नसती; येथें कांहीं तरी कपट आहे! हा विचार मनांत आला ह्मणजे तिनें उसासा टाकून ह्मणावें “कोठेंही असो, देवाच्या कृपेनें सुखी असो ह्मणजे पुरे!”

कांहीं होवो, काळ थोडाच थांबतो आहे! ह्या गोष्टीलाही

सहा सात वर्षें झालीं. एक गेलें त्याच्या जागीं, तिघें ह्मणजे दोन मुली व एक मुलगा, चंद्रीच्या मागें "आई आई" ह्मणून फिरूं लागलीं. पुन्हा संसार थाटल्यासारखा झाला. पुन्हा नारायणराव पहिल्यासारखा वागूं लागला. सारें झालें, पण त्या आईच्या हृदयाला त्या पहिल्या बाळानें सोडिलें नाहीं. हीं वर्षें गेलीं खरीं पण व्यर्थ गेलीं नाहींत. काळग्रंथाच्या ह्या सहा सात पानांवर कित्येक विशेष गोष्टी नमूद झाल्या. नारायणराव मिशनेरींशीं अधिकाधिक संघट्टन ठेवूं लागला. त्यानें पवित्रशास्त्राचा चांगला अभ्यास केला; आपल्या सर्व शंकांचें निरसन करून घेतलें; अक्षय जीवनाचा झरा, आशेचा जनक, प्रीतीचा पुतळा, व पाप्यांचा तारक जो प्रभु येशूख्रिस्त, त्याच्या ठायीं त्याचें मन विलीन झालें. मरणसमयीं आपल्या बापाचा आत्मा पवित्रशास्त्रानें कसा शांत व संतुष्ट झाला, व ख्रिस्तकृपेनें त्यानें कसें मरणाला जिंकिलें, हें त्याच्या पुढें निरंतर दिसून तो बाप्तिस्म्यासाठीं वारंवार आतुर होई. इतर तरुण स्त्रियांच्या व आपल्या बायकोच्या स्वभावांत व वर्तनांत किती अंतर आहे, हें पाहून त्याची ख्रिस्ती धर्मावरची प्रीति वाढत जाई. आपण पापी असून, येशूवांचून आपलें तारण होणें अशक्य आहे, हें त्याला पक्कें समजलें होतें. तो दर रविवारीं ख्रिस्ती देवळास जाई; शाब्बाथ शाळा तर त्यानें कधींच चुकवूं नये; त्याच्या घरांत ख्रिस्ती पुस्तकें किती तरी येत, पण आईकडे पाहून त्याचे हातपाय गळत. तो आपल्या इष्टमित्रांच्या

त्रासाला इतका जुमानीत नव्हता; पण ह्मातारीपुढें त्याचा इलाज चालेना. तथापि एके रविवारीं, तो एका ख्रिस्ती देवळाला गेला. याप्रमाणें तो कधींकधीं जात असे. त्या दिवशीं तेथें त्यानें "वाट व खरेपणा व जीवन मीच आहें" (योहान्न १४:६.) ह्या वाक्याचें फार उत्तम रीतीनें केलेलें स्पष्टीकरण ऐकिलें. त्या समयीं देवाच्या आत्म्यानें, त्याच्या डोळ्यांवरची झांपड पार काढून टाकिली. आपली आत्मिक अवस्था किती भयंकर आहे व प्रभु ख्रिस्तावांचून आपलें तारण होणें कसें असंभवनीय आहे, हें त्याच्या पुढें चांगलेंच दिसूं लागलें आणि त्यानें प्रभूला आपला तारणारा ह्मणून पतकरिलें. तसाच तो घरीं आला व गुडघे टेंकून आपल्या तनमनधनाचें, कुटुंबाचें आणि आपल्या सर्वस्वाचें त्यानें आपल्या तारणाराला अर्पण केलें. सकाळीं उठल्याबरोबर मी आतां ख्रिस्ताचा झालों, ह्मणून त्यानें आपल्या बायकोला सांगितलें. तें ऐकून तिचा आनंद गगनीं मावेना. कचेरीला जातांना, त्यानें आपल्या आईलाहि ही हकीगत कळविली. येथें हें सांगितलें पाहिजे कीं नारायणराव शाळेंत असतांनाच फार हुशार, व नांवाजलेला मुलगा असून म्याट्रिक्युलेशनमध्यें पहिल्या वर्गांत पास झाला होता. त्याचेजवळ शाळेचे दाखले व शिफारशी पण उत्कृष्टच होत्या. त्यामुळें त्याला एकदम चांगली मानाची नौकरी मिळाली असून, पगारही तसाच चांगला मिळत असे. असो; रखमाबाईला

मुलाच्या तोंडची ही हकीगत ऐकून, फारसें कांहीं वाटलें नाहीं. त्याचें अंतःकरण ख्रिस्ती बनत चाललें आहे, हें तिच्या लक्ष्यांत कधींच येऊन चुकलें होतें. त्या नवराबायकोच्या अलीकडे अलीकडे धर्मसंबंधानें मोठ्या आस्थापूर्वक गोष्टी चालत; शिवाय नारायणरावाच्या वृत्तींत चांगलाच फरक पडून त्याचें बोलणें चालणें निराळ्याच प्रेमळ पद्धतीवर आलेलें दिसे, इत्यादि गोष्टींवरून तिला तें पूर्वींच समजलें होतें. पण हा बाप्तिस्मा घेईल, असें मात्र तिला वाटत नव्हतें, त्यामुळें चिरंजीवाच्या तोंडून तो विचार समजतांच तिच्या तळपायाची आग मस्तकीं गेली. तिनें असें तोंड सोडलें कीं त्याला ताळनातंत्र. तिचा आकांत, तिचे शिव्याशाप सोसणें ह्मणजे तें एक दिव्यच होतें. "जा करा हवें तें! असल्या बाट्यांच्या घरांत मी रहाणार नाहीं." असें ह्मणून ती रागारागानें घरांतून निघाली. बाईची तयारी विहिरींत उडी घेण्याची झाली. नारायणरावानें व चंद्रीनें, ममताळूपणानें तिचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. तूं पाहिजे तर येथेंच रहा. आहे हें सारें तुझें आहे. आह्मी यांतून सुतळीचा तोडा सुद्धां घेऊन जात नाहीं. शिवाय मी तुझाच मुलगा आहें, तेव्हां माझी प्राप्ति देखील तुझीच आहे. मी जिवंत आहें तोंपावेतों, तुला कांहीं कमी पडूं देणार नाहीं. अशी नानाप्रकारांनीं नारायणरावानें तिची समजूत केली. सारांश, ह्मातारीनें पुष्कळच त्रागा केला, पण मुलानें व सुनेनें प्रभूचें साह्य मागून, मोठ्या प्रीतीनें व शहाणपणानें, तिच्या

हातून आपली सुटका करून घेतली. तीं दोघें तेथून निघून, दुसऱ्या एका चाळींत रहायाला गेलीं. लौकरच त्यांचा मुलांसह-वर्तमान बातिस्मा झाला, व तीं ख्रिस्ती मंडळींत मिळालीं. आंगावर होतीं तीं पांघरुणें, आणि खुडुकमुडुक चार वस्ता, इतकेंच काय तें बरोबर घेऊन तीं बाहेर पडलीं होतीं; त्यामुळें त्यांना आपल्या नव्या संसाराचा आरंभ, गरिबीच्या पण नीटनेटक्या थाटावर, करावा लागला. तथापि त्यांच्यासारखें सुखी कुटुंब, त्या वेळेस सगळ्या मुंबईत, क्वचितच एखादें असेल. ह्या सुखाला थोडेंसें विरजण पाडणाऱ्या गोष्टी दोनच होत्या; एक चंद्रीच्या सासूनें, चंद्रीला अधिकच पाण्यांत पाहणें; व दुसरी, त्यांच्या प्रथम बालकाचा विरहशोक. मुलगा नाहींसा होऊन आतां उणींपुरीं सात वर्षें होत आलीं असतील, तरी त्या माउलीच्या हृदयांत तो जसाचे तसा होता. ह्या सात वर्षांत, प्रत्येक गोष्टींत त्यांचें स्थित्यंतर झालें; पण त्याबरोबर मुलाची आठवण बुजाली नाहीं. कचेरींतून येतांना बहुधा रोज नारायणराव आईला भेटून येत असे. आपल्या मधुर वाणीनें, व सेवादक्षतेनें, तिला आपलीशी करून घ्यावी व ख्रिस्ताकडे वळवावी ह्मणून त्याचे यत्न सतत चालले होते. रखमाबाई दिवसानुदिवस क्षीण होत होती. रोगाचें चिन्ह तर कांहींच दिसेना. पण ती अधिकाधिक अशक्त व कृश होत चालली होती, हें मात्र खरें. तिचा स्वभावही फार तऱ्हेवाईक झाला. कधीं

कधीं, तिनें आपल्या मुलाशीं ममतेनें वागावें. इतकें कशाला? चंद्रीला भेटायाला गेली ह्मणजे, तिनें तिच्याशीं सुद्धां तसेंच वागावें. केव्हां केव्हां, तिच्याकडे ममतेच्या व केविलवाण्या दृष्टीनें बघत रहावें; पण मग लागलेंच, एकाएकीं संतापाच्या आवेशांत येऊन, त्या दोघांना नाहीं नाहीं त्या शिव्या देत सुटावें. मग मात्र त्या तडाक्यांतून निसटून जाण्यासाठीं, त्यांच्या जीवाची धांदल उडून जावी. एक दिवस पावसाचें कांहीं चिन्ह नसतां, एकाएकीं वावटळ सुटली, व वळिवाचा पाऊस येऊन, कचेरींतून घरीं येत असतां, नारायणराव भिजून चिंब झाला; तरी देखील, क्षणभर आईला भेटून, तसेंच घरीं जावें, अशा इराद्यानें तो तिच्या बिऱ्हाडांत शिरला. पण त्याची आई त्याला उठूंच देईना. घटकेंत शांत, व घटकेंत संतप्त, याप्रमाणें तिची अवस्था होऊन, प्रेमळ वचनें, व भयंकर शाप यांचा एका-मागून एक वर्षाव करण्यांत, किती वेळ गेला तरी नारायण-रावाची सुटका होईना. आतां आहे तें क्षणांत नाहीं, असलें तिचें बरळणें ऐकून त्याला खचीत वाटलें कीं, खरोखर हिला आतां वेड लागणार. आतां अगदीं थंडीनें कुडकुडण्याची वेळ आली असें होईपर्यंत, नारायणरावानें धीर धरिला; पण मग मात्र त्याच्यानें बसवेना. तो बळेंच उठून घरांतून निघाला. आपला नवरा अशा स्थितींत घरीं आलेला पाहून, चंद्रीला फार वाईट वाटलें. तिनें मोठ्या प्रेमानें व आस्थेनें, त्याला बरें वाटावें

ह्मणून, जें जें करण्यासारखें होतें, तें तें केलें. तो दिवस ह्मणजे त्याला पक्काच भोंवला. त्याच दिवशीं, त्याच्या शरीरांत फार वाईट अशा दुखण्यानें, प्रथमतः आपलें ठाणें दिलें. पुढें लौकरच त्याला बरें वाटूं लागून, तो कचेरींत जाऊं लागला पण नेहमीं त्याची कांहीं ना कांहीं कुरकूर असेच. असे कांहीं आठवडे गेले, व एक दिवस संध्याकाळीं तापानें फणफणलेला असा तो भाड्याच्या गाडींत बसून घरीं आला. त्याच्यांत त्राण ह्मणून अगदीं राहिलें नव्हतें. त्यानें त्या रात्रीं जें आंथरूण धरिलें, तें त्याच्या निर्जीव देहाला त्याच्या शेवटल्या विश्रांति-स्थलाकडे नेई तों त्याला सुटलें नाहीं.

नारायणरावाच्या दुखण्याचें, त्याची प्रकृति हळुहळु कशी जास्त बिघडत गेली याचें, व त्याचे शारीरिक वेदनांचें बरोबर वर्णन कोणाला करवेल? त्याच्यासारखा एकनिष्ठ पति, अपत्यवत्सल पिता, सचोटीचा सभ्यगृहस्थ, व्यावहारिक व धार्मिक बाबतींत ज्याच्या विषयीं लोकांस मोठी आशा होती, असा एक तरुण मनुष्य, आपलें कुटुंब, इष्टमित्र, आपला समाज व आपले सारे व्यवसाय, येथल्या येथें सोडून ज्या दिवशीं परलोकीं जाण्याचे तयारीस लागला, त्या दिवसाचें वर्णन आह्मी कोठवर करणार?

प्रीति आणि वैद्यशास्त्र यांनीं सूचित असा प्रत्येक उपचार त्याच्या प्रीत्यर्थ करण्यांत आला. मिशनेरी व मंडळींतील भाऊ-

बहिणी यांच्यामध्यें त्याचा समाचार घेण्यांत, व त्याला समाधान वाटेल अशा गोष्टी करण्यांत जणुं काय चढाओढच लागली. त्याचे ब्राह्मण ज्ञातीय बाळमित्र व कचेरींतील लोकही वारंवार त्याच्या समाचाराला येत. असला प्रेमळ व असला प्रिय तो गृहस्थ होता.

चंद्रीला तर दिवस आणि रात्र यांतला भेदच नाहींसा झाला. निरंतर ती आपल्या त्या सकलप्रीतिनिधानाजवळ बसलेली असे. तिच्या कोमल मुखचर्येवर चिंतेनें चांगलाच पगडा बसविला होता; पण ती मोठ्या प्रयत्नानें, आपली स्थिति नवऱ्यापासून चोरून ठेवी. एकान्तांत जाऊन, तिनें रड रड रडावें पण नवऱ्यासमक्ष सदा हसतमुख असावें. त्या तिच्या मधुर, कोमळ, सुहास्याचें सुख त्याचा तोच जाणे! रोज तिनें त्याला शास्त्रांतून किंवा दुसऱ्या एखाद्या पुस्तकांतून कांहीं तरी वाचून दाखवावें. हें साह्य समाचाराला येणाऱ्या इष्टमित्रांकडूनही त्याला होत असे. ह्या दुखण्यांत देवाच्या वचनांचें मोल, त्याला अधिकाधिक वाटूं लागलें. पुढें पुढें त्याला बोलण्याला सुद्धां शक्ति उरली नाहीं; तरी पवित्रशास्त्र उघडिलें, व त्यांतून पुनरुत्थित ख्रिस्ताची गोष्ट कोणीं वाचून दाखवूं लागलें, कीं त्याच्या नेत्रांत प्रीति व आनंद नाचत आहेत असें वाटे. गीतकार दावीद राजाप्रमाणें तो आपल्या अन्तःकरणांत ह्मणत असावाः—“ तुझीं वाक्यें माझ्या जिभेला किती गोड आहेत?

तीं मधापेक्षां माझ्या मुखाला मधुर आहेत." ( गीत ११९ :१०३ ).

रखमाबाईच्या मनाची स्थिति मात्र या प्रसंगीं फार विलक्षण झाली. दिसण्यांत तिची द्वेषबुद्धि वाढत आहे असें जरी दिसे तरी सर्वथा तसेंच नव्हतें. तिची मुद्रा व शब्द जरी रागाचे येत, तरी तिचें अन्तःकरण, आपल्या एकुलत्या एक मुलाला शरपंजरीं पडलेला पाहून, द्रवून गेलें होतें. त्याची प्रीति, मायाळूपणाचें वर्तन, आपल्या सुखसमाधानाकडे पुरें लक्ष्य, इत्यादि गोष्टींनीं त्या आईच्या हृदयांत, मायेला पूर येऊन केव्हां केव्हां तो पूर, तिचें हृदय फोडून बाहेर पडतो कीं काय, असें तिला होई. तशांत आपण त्याला केवढें दुःख दिलें आहे, हा विचार मनांत येऊन तिचें अन्तःकरण अगदीं उलथेंपालथें व्हायाला लागे. तरी ती फार जपून होती. तिला वाटे कीं जर आपण आपल्या प्रेमप्रवाहास बाहेर वाहूं दिलें, तर आपला सगळा बाणा व्यर्थ जाईल. याप्रमाणें त्यांच्या हातांत जाणें नीट नाहीं, असें समजून ती उलट अधिकच द्राष्टपणा करूं लागली. तिनें उगाच भलतेंसलतें बोलावें व जों जों इकडे तिच्या मनांत माया वाढत जाई, तों तों अधिकाधिकच तिटकारा दाखविण्याचा आव आणावा. मुलगा ख्रिस्ती होऊन निराळा राहूं लागल्यापासून आजपर्यंत, ती त्याच्या घराचा उंबरा चढली नव्हती. आतां त्याच्या दुखण्यांत तिचें मन वारंवार त्याच्याकडे

ओढ घेई. त्याच्या दुखण्याच्या बऱ्या वाईट बातम्या रोज समजत. तो रोज तिला "येऊन भेट" ह्मणून प्रीतीचे निरोप पाठवी; तिच्या मनांत जावें असें येई पण लागलेंच तिच्या हृदयाचे दोन तुकडे होण्याची वेळ येऊन ती पटकन् खालीं बसे.

एक दिवस तिला समजलें कीं, आपला मुलगा ह्या दुखण्यांतून वांचेल अशी आशा नसून त्यानें आपल्या भेटीचा नाद घेतला आहे. आईच ती! ती कोठपर्यंत अंत पाहणार? ती एकदम घरांतून निघाली ती, ऊर धडधड करीत आहे अशा स्थितींत, नारायणरावाच्या घरीं येऊन दाखल झाली. मुलगा निजला होता त्या खोलीजवळ ती गेली तों, तिच्या कानीं कोणा तरी साहेबाचा शब्द येऊन ती तशीच स्वयंपाकाच्या खोलींत शिरून, दाराआड उभी राहिली. ती एकाएकीं, कांहीं संभव नसतां आलेली; तशांत ती घरांत शिरली, तीही अगदीं गुपचूप, पाय न वाजवितां शिरली; त्यामुळें तें कोणाच्या लक्ष्यांत आलें नाहीं. तशांत, आलेले मिशनेरीसाहेब पवित्रशास्त्र वाचून त्याचें स्पष्टीकरण करीत होते, त्यांत सगळ्यांचीं मनें गुंगून गेलीं असल्यामुळें, चुकून सुद्धां कोणाचें लक्ष्य तिच्याकडे गेलें नाहीं. "उधळ्या पुत्राची" गोष्ट नारायणरावाला फार आवडत असे ह्मणून, साहेब तीच वाचून दाखवून, तिच्यावरून बोध करीत होते. आपला हरवलेला मुलगा पुन्हा आलेला पाहतांच पूर्वींच्या सर्व गोष्टी कोठल्या कोठें जाऊन,

त्याच्या बापाला कसा अत्यानंद झाला, त्याचें वर्णन ते करीत आहेत, इतक्यांत रखमाबाई आली. साहेबांचें भाषण तिच्या अन्तःकरणाला चांगलेंच झोंबलें. व ती उभी होती ती खालीं बसून साऱ्या गोष्टी लक्ष्यपूर्वक ऐकूं लागली. साहेब अंमळ थांबले, तेव्हां नारायणराव आपल्या खोल गेलेल्या शब्दानें ह्मणाला, "किती सुंदर गोष्ट आहे ही! मी सुद्धां असाच हरवलेला असून बापाकडे आलों! नाहीं का! याचा त्याला किती किती पण आनंद झाला असेल! आतां मी येथून जाईन, तेव्हां तो कसा प्रेमानें येऊन मला आपल्या हृदयाशीं आलिंगून धरील! मीच नाहीं, तर माझें सारें कुटुंब त्याच्याकडे आलें आहे." इतकें ह्मणून तो क्षणभर थांबला, व लागलाच मोठ्या आवेशानें ह्मणाला, "देवा, बापा! माझा बाळकृष्ण, माझा प्रिय लहान बाळ! कोठें आहे? त्याला सुद्धां तुझ्याकडे आणावेंसें मला वाटतें!" नंतर त्यानें चंद्रीकडे पाहिलें, त्याबरोबर त्याच्या मुखावर मधुर, कोमल स्मित शोभूं लागलें. तो तिला ह्मणाला, "कदाचित् दयाळू देवानें मागेंच आपल्या बाळाला आपल्याजवळ नेलें असेल; आतां लौकरच मी आपल्या लाडक्याला भेटेन! नाहीं बरें?"

त्यानें चंद्रीकडे तोंड फिरविलें, तेव्हां रखमाबाईच्या तें पुरतेपणें दृष्टीस पडलें. त्यांत किती तरी फरक पडला होता! तें अगदीं सुकून गेलें होतें; त्याच्यावर तजेला ह्मणून अगदीं

राहिला नव्हता; तें नुसतें पांढरें फटफटीत दिसत होतें. आणि त्याचे ते सुंदर डोळे ते नेहमींपेक्षां किती तरी मोठे दिसत होते. रखमाबाईनें क्षणभर त्याच्याकडे पाहिलें; ती आपली आपणास विसरली; तिला एकदम रड्याचा हुंदका आला व एकदम स्वयंपाकघरांतून ती निघाली. सारीं माणसें चकित होऊन तिच्याकडे पाहत आहेत, इतक्यांत ती थेट नारायणरावाजवळ जाऊन, त्याच्या आंगावर आपले हात ठेवून, धाय मोकलून रडत सुटली. नारायणराव फारच क्षीण झालेला, त्यामुळें हें पाहून चंद्रीला व मिशनेरीला फार भय वाटलें; व तीं दोघें रखमाबाईला आतां दूर करणार, इतक्यांत नारायणरावानें त्यांना तसें करूं नका ह्मणून खुणाविलें. त्यानें मोठ्या प्रेमानंदानें, आपल्या क्षीण झालेल्या हातानें, आपल्या आईचे डोळे पुशिले; व आई जशी मुलाला कुरवाळते, त्याप्रमाणें तिला कुरवाळून, फार गोड शब्दांनीं तिचें सांत्वन केलें. पण रखमाबाईचा दुःखावेश कांहीं केल्या कमी होईना. नारायणरावाच्या कुशींत, पांघरुणांत तोंड घालून ती एकसारखी रडत होती; व त्यांतच मधून मधून कांहीं तरी बोलत होती; पण तिचे सगळे शब्द ऐकूं येत नव्हते. अशा स्थितींत तिचे उद्गार निघाले तेही अर्धवटच निघाले. "जळो! जळो माझें तोंड! ह्यापेक्षां मीं उपजतांक्षणींच मेल्यें कां नाहीं? मारा मला! द्या हांकलून! असली पापीण जगून

करायाची काय?" हे व असल्याच प्रकारचे कांहीं असंबद्ध उद्गार मात्र ऐकण्यांत आले.

नारायणरावाच्यानें आतां हें सोसवत नाहीं असें पाहून, मिशनेरीनें अधिकारानें तर खरेंच, पण मोठ्या गोडीनें रखमाबाईला त्याच्या पासून दूर करून, तिच्या मनाचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करून पाहिला पण ती झटक्यासरशी तेथून जी उठली, ती पार घरांतून चालती झाली.

दुसरे दिवशीं, तुमचा मुलगा आज अधिकच खंगला असून, तुमची वाट पाहत आहे, हा निरोप घेऊन एक मनुष्य त्या दुःखी आईच्या बिऱ्हाडीं गेला; पण पाहतो तों दरवाजाला कुलूप. ती आली केव्हां, गेली केव्हां, हें शेजाऱ्यापाजाऱ्यांना मुळींच ठाऊक नव्हतें. हें ऐकून दुःखानें व धास्तीनें, चंद्रीची कमर खचून गेली. कारण, त्या आईचें दुःख पाहून तिला तिचा फार कळवळा आला होता. त्या शहाण्या बायकोनें झालेली हकीगत, व त्यामुळें आपल्याला वाटणारी भीति, यांतलें एक अवाक्षर देखील नवऱ्याला कळूं दिलें नाहीं. आपली आई पुन्हा आपली भेट घेऊं इच्छीत नाहीं, इतक्यानेंच कायतें त्याला वाईट वाटत होतें. ह्याला चार पांच दिवस लोटले, तों एक दिवशीं सकाळीं चंद्रीची एक मैत्रीण, मोठ्या गर्दीनें येऊन तिला ह्मणाली "चला! चला! रखमाबाई आतांच्या आतां तुह्मांला बोलावीत आहेत! हूं! चला याच पावलीं!" हें ऐकून चंद्रीला फारच आश्चर्य वाटलें.

ती आपल्या एका मैत्रिणीला नारायणरावाजवळ रहायाला सांगून, तशीच निघाली. निरोप घेऊन आलेल्या बाईला तिनें खोदखोदून विचारिलें कीं आहे तरी काय! पण "कांहीं नाहीं. चला! आणि पाहा काय आहे तें!" ह्यावांचून ती कांहींच थांग लागूं देईना.

चाळीजवळ आल्यावर ती कांपत कांपतच, तो पूर्वींचा ओळखीचा जिना चढून वर गेली; व जवळच्याच आपल्या जुन्या परिचयांतल्या घरांत शिरली. तिला वाटत होतें कीं, दुःखानें आपली सासू मरणाच्या पंथास लागली असून, तिची शेवटची भेट घेण्यास आपण चाललों आहों. पण घरांत जाऊन ती पाहते तों रखमाबाई खालीं मान घालून, एका कोपऱ्यांत बसली आहे. "काय होतें तुह्मांला? बरें नाहीं का वाटत? मला कशाला बोलावणें पाठविलें?" असें मोठ्या ममतेनें तिनें तिला विचारिलें. रखमाबाईनें वर न पाहतां, विलक्षण आवाजानें तोंडांतल्या तोंडांत ह्मटलें, "मला काय व्हायाचें आहे आतां? असल्या राक्षसणीला हजार वर्षांचें आयुष्य असणार! मी आपल्या पोटच्या गोळ्याला मारणारी अवदसा! मला मृत्यु तरी कसा शिवेल? उचला, उचला मला! असल्या लांवेला नेऊन फेंकून द्या कोठें तरी!" चंद्रीला वाटलें कीं हिचें डोकें फिरलें असावें. ती मधुर वाणीनें तिला ह्मणाली— "असें भलतेंच काय मनांत आणतां? तुह्मी आपल्या मुलाला कशा मा-

राल! देव त्यांना आपल्या घरीं बोलावीत आहे. अजून आपल्या मुलाला पूर्ण सुखी करण्याचें तुमच्या हातीं आहे. ज्या प्रभूवर त्यांचें अतोनात प्रेम आहे, त्याला तुह्मी स्वीकारा; ह्मणजे त्यांच्या आनंदाला पारावार रहाणार नाहीं. तो सर्वांना तारणारा आहे." हें ऐकून रखमाबाई मोठ्यानें ओरडली "काय? मला तारणारा! माझें तारण! जगांत कोणाच्यानें तरी होईल का?" नंतर क्षणभरानें तिनें वर मान करून चंद्रीकडे पाहिलें. त्या वेळची तिची दृष्टि, चंद्रीच्या हृदयाचें जणुं काय भेदनच करीत होती. अशा तऱ्हेवाईक रीतीनें तिच्याकडे टक लावून, ती तिला ह्मणाली— "त्याचा मुलगा पुन्हा त्याला मिळाला तर तो वांचेल का?" हे शब्द कानीं पडतांच, पूर्वीचे सारे संशय व आशा, चंद्रीच्या मनांत एकवटून आल्या; तिच्या आंगावर रोमांच उभे राहिले. तिनें आशा, उत्कंठा, वात्सल्य, इत्यादि मनोविकारांनीं वेडावलेल्या दृष्टीनें आपल्या सासूकडे पाहून ओरडून विचारिलें— "सांगा कोठें आहे? कोठें आहे तो! कोठें आहे माझें बाळ? आणा! द्या लौकर माझा मला!" त्या आवेशांत, तिनें आपल्या सासूचे खांदे धरून, तिला गदगदा हालविलें; व पुन्हा ह्मटलें, "ऐकूं आलें का? उठा! आतां, या क्षणीं माझें बाळ मला द्या!" रखमाबाई नुसती मोठ्यानें उसासा टाकून ह्मणाली, "रामा, तूं आहेस!" तिनें जवळच्या खोलीचें दार उघडिलें; त्याबरोबर चंद्री

धावतच आंत गेली तों तिच्या पुढें एक नऊ दहा वर्षांचा सुरेख, गोजिरवाणा मुलगा उभा! ती त्याच्याकडे पाहायाला देखील क्षणभर थांबली नाहीं. तिनें जाऊन त्याला घट्ट आलिंगून धरिलें; आपल्या अश्रूंनीं त्याला न्हाणिलें; ती रडली, पुन्हा पुन्हा त्या मुलाला घट्ट घट्ट आंवळून धरूं लागली. त्या भरांत आतां ही त्या कोमळ मुलाचा चुराडा करिते कीं काय असें वाटलें. बिचाऱ्या मुलाला हें गूढ मुळींच उलगडेना.

नंतर एकाएकीं ती आपल्या सासूकडे वळून, तिच्या तोंडाकडे पाहूं लागली. बिचारी सासू भेदरून वेडावल्यासारखी दिसत होती. तिला सहजच वाटलें असेल कीं, आतां ही आपल्यावर सपाटून ताशेरा झाडणार. पण तसें झालें नाहीं. तिनें तोंड फिरवून गुडघे टेंकिले व बहुतेक आशा नष्ट झाली असतां, इतक्या वर्षांनीं, अजून आपल्या पतीच्या देहांत प्राण आहे तोंच, परमेश्वरानें आपला मुलगा आपणास दिला, ह्मणून त्याचे उपकार मानिले. ही प्रार्थना चालली असतां मधून मधून, तिला रडण्याचे हुंदके येतच होते. आमच्या छोट्या बाळासाहेबांला, आपण केव्हां एकदा ह्या कचाटांतून सुटूं, असें झालें असेल यांत संशय नाहीं. पण निघून जायाला मात्र त्यांना धीर होईना. प्रार्थना आटोपल्यावर, चंद्री शांतपणानें उठली. एका हातानें तिनें आपल्या मुलाचा हात धरिला, व दुसरा

हात सासूकडे करून ती ह्मणाली "चला, आतां आपण त्यांच्याकडे जाऊं."

रखमाबाई उठली. व आपल्या सुनेचा हात धरून गरिबासारखी तिच्या बरोबर निघाली. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या, व ती पदोपदीं डोळे पुशीत होती. त्या पितापुत्रांची गांठ पडून, आपण तें सुख डोळे भरून पाहावें, ह्मणून ती उत्कंठित झाली होती. तथापि मरणाच्या दाराशीं येऊन पडलेल्या त्या प्राण्याच्या मनाला, हा आनंदातिशय सहन होईल कीं नाहीं, ही मोठीच विवंचना तिला लागली होती. आपला मुलगा शिव्याशाप देईल, असें तिच्या मनांत सुद्धां आलें नाहीं. कसला कां प्रसंग असेना ! त्याच्या मुखांतून प्रीतीचाच झरा वहायाचा, हें तिला पक्कें ठाऊक होतें. आणि देईल तो शिव्याशाप असें जरी तिला वाटलें असतें, तरी ती गेलीच असती. तिला समजत होतें कीं, शिव्याशापाच्या पलीकडे जरी तो गेला, तरी आपला अपराध त्याच्याही पलीकडचा आहे.

रस्त्यांतून जात असतां, त्या तिघांनीं एक चकार सुद्धां तोंडांतून काढिला नाहीं. लहान मुलें सहसा अशीं गप्प रहायाचीं नाहींत. पण एकतर मुंबई शहरांतलीं तीं घरें दारें, गाड्या घोडे, दुकानें, सारीच नवी सृष्टि दृष्टीस पडल्या बरोबर, तो थक्क होऊन गेला होता; दुसरें, त्याला असा घट्ट आंवळून धरणारी ती बाई, त्याच्या बरोबरच होती! तिचें भय

त्याला थोडें वाटत नव्हतें. त्यामुळें बाळकृष्णाही गपचूप पाय उचलीत होता. घरीं येऊन पोंचल्यावर मात्र, चंद्री सासूला ह्मणाली "मी बोलावींपर्यंत मुलाला स्वयंपाकघरांत घेऊन जा."

ती नवऱ्याच्या खोलींत गेली तेव्हां त्यानें प्रीतीनें तिजकडे हसून पाहून ह्मटलें—"माझी चंद्रिका माझ्या डोळ्यांचें चांदणें इतका वेळ कोठें होतें? मला तुझा विरह क्षणमात्र सहन होत नाहीं." तिनें त्याच्याजवळ बसून त्याच्या आंगावरून हात फिरवून ह्मटलें "काय? इतके का आपण माझ्यासाठीं वेडे होतां? देवानें आपल्याला आज फार मोठी, फार मोलवान् देणगी दिली आहे, ह्मणून मी त्याचे उपकार मानीत होत्यें." त्यानें आपल्या मोठ्या डोळ्यांनीं जिज्ञासापूर्वक तिच्या तोंडाकडे पाहून ह्मटलें—"कशाची देणगी? नीट सांग गडे काय आहे तें." तिला वर पाहावेना; तशीच खालीं मान घालून, ती सद्गदित शब्दानें ह्मणाली, "प्रिया! देवानें आपणावर कृपा केली आहे." नारायणराव ह्मणाला "होय, तो सदैव कृपाच करीत आहे; पण आज नवलविशेष काय झालें आहे तें तर सांग." प्रथमतः त्याला सहजच वाटलें कीं, आपल्या रोगावर एखादें रामबाण औषध हिच्या ऐकण्यांत आलें असावें; किंवा वैद्यांनीं आपली जगण्याची आशा आहे ह्मणून सांगितलें असावें. तेव्हां या आशेनें तो ह्मणाला, "माझ्याविषयीं असेल कांहीं तरी! होयना?"

चंद्रीनें वर मान करून, फारच प्रेमळ दृष्टीनें नवऱ्याच्या तोंडाकडे पाहून ह्मटलें, " हा शब्द कोणाचा ऐकूं येतो? ऐकला का!" याच वेळेस बाळकृष्ण स्वयंपाकघरांत उगाच तिष्ठत रहाण्याला कंटाळून, आजीच्या हातून सुटून, " कोठें आहेत माझे बाबा! मला माझ्या बाबांना भेटायाचें!" असें ह्मणत ह्मणत बाहेर पडला होता.

ते शब्द ऐकून नारायणरावाचा सगळा आत्मा एकवटून, त्याच्या दृष्टींत आला. तो मोठ्या उत्साहानें ह्मणाला: "कोण! कोण? आपला मुलगा? बाळकृष्ण?" पुढें तो आणखी कांहीं बोलणार, इतक्यांत बाळकृष्ण खोलीच्या दाराशीं येऊन दाखल झाला; व चंद्रीनें त्याला आंत येण्याविषयीं खूण केली. रखमाबाई त्याच्या मागेंच होती; तिनें त्याला तसाच पुढें ढकलून ह्मटलें "जा, पण गडबड करूं नको." तो आंत गेल्याबरोबर, त्याच्या आईनें मोठ्या प्रेमानें त्याला पोटाशीं धरिलें; व आईच्या स्वभावाप्रमाणें अत्यंत उत्सुकतेनें, त्या आपल्या प्रथमसंतानाला, त्याच्या बापापुढें केलें. प्रथमतः त्या निस्तेज, क्षीण झालेल्या, आपल्या बापाच्या तोंडाकडे पाहून मुलगा चपापला. पण त्याच्या प्रेमानें थबथबलेल्या डोळ्यांकडे त्यानें पाहिलें मात्र, लागलेंच लोहचुंबक व सुईप्रमाणें त्यांची स्थिति झाली. तो अत्यंत उत्कंठेनें बापाकडे पहात राहिला. इकडे आई बिछान्यावरच गुडघे टेंकून, आपल्या भरून आलेल्या हृदयाचें, हुंदके देण्यानें सांत्वन करीत होती.

नारायणरावानें आपल्या अस्थिप्राय झालेल्या हातानें, मुलाचा हात धरून त्याला जवळ जवळ ओढून घेतलें. इतकें कीं तो बापाच्या अंगावर जाऊन पडल्यासारखा झाला. आपल्या बापानें आपणास उराशीं आलिंगून धरिलें आहे असेंच त्याला वाटलें. नारायणरावानें त्याचे किती तरी मुके घेतले. नंतर त्याला सोडून तो ह्मणाला "बाळ, ती पहा तुझी आई गुडघे टेंकून बसली आहे, तसे तूं टेंक पाहूं." मुलानें तसें केल्यावर, त्यानें आपला हात त्याच्या मस्तकावर ठेविला, व अत्यानंदानें सद्गदित झालेल्या स्वरानें प्रार्थना केली कीं, "प्रभु, हें तुझें लेंकरूं आहे, ह्याला आशीर्वाद दे. आतां आपल्या ह्या सेवकाला सुखानें घेऊन जा." रखमाबाई दुरून हें सर्व पाहात होती; ती तशीच हळूच खोलींत शिरून आपल्या नातवाशेजारीं गुडघे टेंकून बसली; व दुःखाच्या स्वरानें नारायणरावाला ह्मणाली—"मुला, नाना! मला आशीर्वाद दे. माझी क्षमा कर. आपल्या ह्या दुर्दैवी, पापी, आईला एकवार आशीर्वाद दे." नारायणरावानें तिला आशीर्वाद दिला, व तिची क्षमा व्हावी ह्मणून, मोठ्या कळवळ्यानें देवाची प्रार्थना केली. प्रभूच्या पायांजवळ रदबदली करून, आपल्या आईचें तारण व्हावें ह्मणून मागत असतां, त्याचा आवाज अधिकाधिक खुलत चालला. त्या खोलींत देवाची समक्षता भासूं लागली; जणुं काय त्या समक्षतेनें तें स्थल भरून गेलें. रखमाबाईला त्याचा अनुभव झाला, व ती मध्येंच ह्मणाली "प्रभू!

पतितपावना, मला टाकूं नको. माझें तारण कर. आतांपासून सदा सर्वकाळ मी तुझी झाल्यें." हें ऐकून नारायणरावाच्या मनाला इतका हर्ष झाला कीं, त्याच्या अशक्त प्रकृतीला तो सहन न होऊन तो तसाच अंथरुणावर पडला. त्या श्रमानें त्याच्या चेहऱ्यावर प्रेतकळाच दिसूं लागली; तरी तेथें आनंद व शांति मूर्तिमंत रेखलेलीं दिसत होतीं.

पुढें आठच दिवस नारायणरावानें मोठ्या सुखानें ह्या जगांत काढिले. चंद्रीची प्रीति, व आईची माया, आणि त्या पुन्हा सांपडलेल्या मुलाविषयींचें वात्सल्य यांचा अनुभव घेण्यांत त्याला किती पण आनंद होत असेल! बाळकृष्णाला आपल्या बापाजवळच बसून रहावेंसें वाटे. त्यानें लेंकुरपणाच्या मायाळूपणानें बापाच्या तोंडाकडे पहात रहावें, आणि बाप लडिवाळपणानें आंगावरून हात फिरवीत असला म्हणजे आनंदित व्हावें. प्रसंग मिळाल्याबरोबर रखमाबाईनें, बाळकृष्णाचा एकाएकीं नाहींसा होण्याचा वृत्तांत चंद्रीला सांगितला. तेव्हां चंद्रीनें आग्रहानें तिला सुचविलें कीं, तो वृत्तांत नारायणरावाला अगदीं कळूं देऊं नये. आपला मुलगा पुन्हा आपणास मिळाला यांतच नारायणरावाला पूर्ण समाधान वाटत होतें. त्यानें त्या बाबतींत एक देखील प्रश्न कधीं कोणास विचारिला नाहीं; कदाचित् तो जाणून होता कीं, ती हकीगत ऐकून घेण्याइतका आवांका आतां आपल्या आंगीं उरला नाहीं.

पुढच्या रविवारीं, मिशनेरीसाहेब व मंडळींतले चार भाऊ, प्रभुभोजन घेऊन नारायणरावाकडे आले. आपल्या तारकाच्या समक्षतेंत अक्षय जाऊन रहाण्यापूर्वी इहलोकीं त्यानें लावून दिलेला हा विधि, शेवटचा त्यास घडावा हा हेतु धरून ते आले होते. जमलेली मंडळी गीत गाण्याचे बेतांत आहे इतक्यांत रखमाबाई पुढें होऊन, आपल्या मुलाजवळ बसून, मिशनेरींला ह्मणाली "साहेब मला बाप्तिस्मा द्या, मीं फार दुष्टपणा केला आहे खरा, पण येशूनें माझ्या सर्व पापांची क्षमा केली आहे. मी आतांपासून सदासर्वदा त्याची आहें." हें ऐकतांच नारायणरावाच्या चेहऱ्यावर, हर्षाची कळा दिसूं लागली. त्यानें आपल्या खोल गेलेल्या स्वरानें ह्मटलें, "घ्या! माझ्या आईला घ्या! मंडळींत तिचा चांगला सांभाळ करा." मंडळींतल्या कित्येक बाया, चंद्रीच्या साह्यार्थ नेहमीं तिच्या घरीं येत असत. रखमाबाईच्या वृत्तींत कसा नवल करण्यासारखा फरक पडत चालला होता, हें त्यांनीं पाहिलें होतें. त्यांनीं तिच्याविषयीं फार चांगली साक्ष दिली. नंतर तिला कांहीं प्रश्न विचारण्यांत आले. त्यांचीं उत्तरें तिनें बरीं दिलीं; व तिचा तेथल्या तेथें बाप्तिस्मा होऊन, तिचा मंडळीनें स्वीकार केला. त्या समयीं प्रभु ख्रिस्तांत संयुक्त झालेल्या त्या कुटुंबास पाहून, स्वर्गात व पृथ्वीवर आनंद तांडव करूं लागला. कारण आईबापांच्या विनंतीवरून, बाळकृष्णाचाहि बाप्तिस्मा त्याच वेळेस करण्यांत आला. गरीब बिचारें पोर! मी ब्राह्मण,

ह्या अभिमानाशिवाय, त्याला काय ठाऊक होतें? प्रार्थना ह्मणजे काय, तिचें बळ किती अगाध आहे, आपल्या स्वर्गीय बापाची प्रीति, ज्या प्रीतीनें त्याचें हृदय लौकरच त्या धन्य धन्य तारकाच्या स्वाधीन केलें, ती किती आहे ह्या गोष्टींची त्या वेळेस त्याला गंधवार्ता सुद्धां नव्हती.

प्रभुभोजन आटोपलें. शेवटली प्रार्थना होऊन मंडळी उठली, तों नारायणरावानें आपल्या आईचा हात धरिला, व जणुं काय ख्रिस्त प्रत्यक्ष त्याच्या पुढें उभाच आहे, अशा रीतीनें टक लावून ह्मटलें; "प्रभु! ही माझी आई!"—हे चारच शब्द फार हळू पण स्पष्टपणें ऐकूं येण्यासारखे, त्याच्या मुखांतून निघाले. नंतर एक मोठा श्वास सोडून त्यानें आपले डोळे मिटले. त्याच्या तोंडावर त्या वेळेस जी विजयश्री झळकत होती, ती पाहून, जवळच्या सर्व माणसांच्या मनांत दरारा व सत्कारबुद्धि उत्पन्न झाली. तीं त्याच्याकडे पहातच आहेत, इतक्यांत ती दिव्य कांति नाहींशी झाली व तिच्या बरोबर नारायणरावाचा आत्माहि निघून गेला—आपल्या प्रभूसह निरंतर रहाण्यासाठीं चालता झाला. खोलींत सारें चुप्प झालें व मिशनेरी साहेबांनीं गुडघे टेंकून प्रार्थना केली कीं:—"प्रभु, तुझें वैभव आह्मीं पाहिलें! आमच्या बंधूच्या आत्म्याचा अंगीकार कर."

चंद्री अंथरुणाजवळच गुडघे टेंकून त्या शांत, समाधिस्थ मुखाकडे एकसारखी पाहात होती. जणुं काय आपण स्वप्नांतच

आहों असें तिला वाटत होतें. रखमाबाईला वाटलें कीं आपल्या लोकांच्या चालीप्रमाणें आपण गळा काढून रडावें. पण तो देखावा इतका गंभीर, इतका पवित्र, इतका सुंदर होता कीं, त्या शांततेचा भंग तिच्याच्यानें करवेना. खरोखरच आपला पति गेला, अशी चंद्रीच्या मनाची खात्री झाल्यावर, ती शांतपणें उठली व जवळच्या खोलींत जाऊन, तिनें दरवाजा लावून घेतला. ती बाहेर आली तेव्हां तिच्या गोड चेहऱ्यावर नवीनच छाया आली होती. जणुं काय तिच्या सर्व दुःखांचा भार आपल्या शिरावर घेणाराची व तिची भेट होऊन, ती बाहेर आली होती. नंतर मिशनेरीचें व तिचें मृताच्या उत्तरकार्यासंबंधानें बोलणें झालें. ज्यांच्या साह्याची तेथल्या तेथें गरज होती, तितके मित्र खेरीज करून, बाकीची मंडळी जायाला निघाली; तेव्हां प्रत्येकानें मोठ्या कळवळ्यानें चंद्रीच्या हातांत हात दिला, व कित्येकांनीं प्रेमळ शब्दांनीं तिला आश्वासन दिलें. रखमाबाईलाही त्या ख्रिस्ती प्रीतीचा अनुभव मंडळीनें दिला; व ती आतां आपल्यांतली झाली ह्मणून प्रत्येकानें तिचें मनापासून अभिनंदन केलें. ती बिचारी आनंदातिशय व दुःखातिशय, यांच्यामध्यें सांपडून वेड्यासारखी झाली होती.

दुसरे दिवशीं नारायणरावाच्या प्रिय देहाची उत्तरक्रिया करण्यांत आली. तत्संबंधाची उपासना मंडळीच्या देवळांत झाली. त्या प्रसंगीं त्याचे पुष्कळच इष्टमित्र हजर होते. त्याचे जुने ब्रा-

ह्मण बाळमित्र, कचेरींतले लोक, त्याच्या भाऊबहिणी वगैरे मिळून देवळांत बरीच गर्दी झाली होती. उपासनेच्या आरंभीं मिशनेरीनें शास्त्र उघडून "पुन्हा उठणें व जीवन मी आहें" हे शब्द वाचून दाखविले. ते कानीं पडतांच चंद्रीनें एकदम वर मान करून, मोठ्या आशेनें श्रोत्यांकडे पाहिलें. तिची खात्री झाली कीं आपला नवरा मेला नाहीं; तर जेथें मरण हा शब्द सुद्धां माहीत नाहीं, अशा सुखस्थळीं रहायाला गेला.

हळू हळू हिंदू विधवेच्या, विशेषतः ब्राह्मण विधवेच्या, जिण्यांत व ख्रिस्ती विधवेच्या जिण्यांत केवढें अंतर आहे, हें रखमाबाईच्या लक्षांत आलें. नेहमीं दुःख व रड! समाधानाला ह्मणून जागा नाहीं, सदा अपमान! जगानें आपलें मुखावलोकन सुद्धां अशुभ मानण्यापर्यंत अपमान, सदा निराशा! मेल्यावर प्रेताची देखील धडगत होण्याची पंचाईत, पुरी नागवणूक! वस्त्रप्रावरणें, दागदागिने तर असोतच, पण ईश्वरदत्त केशकलापाचा सुद्धां त्याग व विटंबना; मनाची स्थिति कशीहि असो! निरंतर उपास व एकभुक्त रहाणें; इत्यादि गोष्टी आपल्या सदय सुनेच्या शांत घरांत आल्यापासून, तिच्या डोळ्यांपुढें रेखल्यासारख्या उभ्या राहूं लागल्या.

मुलगा वारल्यावर पुष्कळ दिवस रखमाबाई आपला बहुतेक दिवस सुनेच्याच घरीं काढीत असे. एक दिवस, ही वेळ बोलायाला चांगली आहे असें वाटून, ती चंद्रीला ह्मणाली "चल

आतां माझ्या घरीं, आपण दोघी एकाच ठिकाणीं राहूं." क्षणभर चंद्रीला वाटलें कीं, आपल्या सासूला दयामाया नाहीं, व ती उतावळेपणानें तिला ह्मणाली "काय! ज्या घरांत मीं इतक्या सुखानें संसार केला तें सोडून येऊं का? कृपा करून मला असें करायाला सांगूं नका." पण लागलीच, आपल्या सासूच्या खिन्न, निराश मुद्रेकडे तिचें लक्ष जाऊन ती ह्मणाली: "नाहीं, नाहीं, सासूबाई, मी चुकलें. तुह्मी माझ्या घरीं येऊन रहावें, त्यापेक्षां मीच तुमच्या येथें यावें, हें मला बरें दिसतें. चला तर आपण तुमच्या ह्मणण्याप्रमाणें एकत्रच राहूं." त्याप्रमाणें लौकरच व्यवस्था झाली. ज्याचा इतका लोभ लागलेला, तें आपलें घर चंद्राबाईनीं सोडिलें, व आपलीं मुलेंबाळें घेऊन, त्या आपल्या सासूबरोबर राहूं लागल्या. ह्मणजे लहानपणीं लग्न होऊन, ज्या स्थळीं तिच्या संसाराचा ओनामा तिला मिळाला, त्या स्थळीं ती पुन्हा गेली.

रखमाबाई आतां आपल्या शेजाऱ्यांना एक चालता बोलता चमत्कारच होऊन गेली. पूर्वीं चाळीच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत, तिची गर्जना सर्वांस ऐकूं यावयाची, तिचें आतां नांव नाहींसें झालें. एखादे वेळेस चाकरानें भलतेंच कांहीं तरी करून बसावें, किंवा एखाद्या फेरीवाल्यानें तिला फसविण्याचा प्रयत्न करावा, आणि तिचें पित्त खवळून तिनें मोठ्यानें बोलूं लागावें. तें ऐकून शेजाऱ्यांनीं हसून ह्मणावें "असो; रखमाबाईला

अजून रागानें बोलतां येतें! अगदींच विसर पडला नाहीं." पण त्यांची असली टीका चालली आहे इतक्यांतच, तिला वाईट वाटून तिचा पंचमापर्यंत चढत जाणारा आवाज, एकदम खर्जांत येई. मग मात्र त्यांना अधिकच नवल वाटे.

बिचाऱ्या बाळकृष्णाची स्थिति मात्र चमत्कारिक झाली होती. त्याच्या भोंवतीं सारी वसति ब्राह्मणांची होती. त्यांचें आणि त्याचें खातेंपोतें जमून जावें; पण काय असेल तें असो, त्याला आपलें शांत घरच अधिकाधिक प्रिय होऊं लागलें. त्याच्या आई-आजीला भेटायाला क्वचितच कोणी येत. त्या आतां बाटल्या होत्या! त्यांच्या तोंडावर त्यांना कधीं कोणीं असें ह्मटलें नाहीं; पण लोकांना तसें ह्मणतांना त्यानें पुष्कळ वेळां ऐकिलें होतें. तथापि असें ह्मणतांना लोक प्रीतिपूर्वक त्यांचे गुण घेत असत, हेंही त्याच्या लक्षांत आलें होतें. केव्हां केव्हां पोरें त्याच्या प्रिय कुटुंबाची कुचेष्टा करून कांहीं तरी भकूं लागत; मग मात्र तो संतापानें लाल होऊन हातघाईवर येई. पण त्यानें अशी एखादी मारामारी केली, ह्मणजे त्याच्या आईला त्याच्या रागीटपणाचा व उतावळ्या स्वभावाचा फार खेद होऊन, ती त्याचा ममतेनेंच पण निक्षून निषेध करी; कीं लागलाच त्याला पश्चात्ताप होऊन, आतां आईला दुःख होईल असें कांहीं करायाचें नाहीं, असा त्यानें निश्चय करावा. दिवसानुदिवस तो चांगला मातृभक्त

होत गेला, व थोडक्याच काळांत आपल्या आईच्या देवाला शरण जाऊन तो ख्रिस्तीपणानें वागण्यास झटूं लागला.

ह्या दोन स्त्रियांचा अक्षरशः साद्यंत इतिहास देण्यास अवकाश नाहीं. तथापि ख्रिस्तप्रीतीनें त्यांच्या नित्य चरिताला कोणतें वळण दिलें, तें सांगायाचें सोडून ही गोष्ट अपुरी टाकणें आह्मांला आवडत नाहीं.

थोड्याच दिवसांत रखमाबाईचें घर "कष्टकरी ओझ्यानें लादलेले" अशांचें विश्रांतिस्थान बनलें. सहानुभवामुळें आपलें दुःख जाणणाऱ्या ह्या दोन विधवांकडे, वारंवार कित्येक विधवा येऊन आपलीं हृदयें मोकळीं करीत, व प्रभूची अलौकिक प्रीति व अतुल्य दया, यांचें वर्णन, डोळ्यांत आंसवें आणून ऐकून घेत. एखादी तरुण विधवा, किंवा दुःखी सधवा, चंद्रीच्या मांडीवर डोकें ठेवून पडली आहे, चंद्री तिचें मंजुळ शब्दांनीं सांत्वन करीत आहे, किंवा पवित्र शास्त्रांतून एखादें प्रकरण वाचून दाखवीत आहे, हा देखावा त्यांच्या घरीं वारंवार दृष्टीस पडे. त्यांच्या घरीं कोणी आलें, आणि त्यानें खीस्त व तारण या संबंधानें कांहीं ऐकिलें नाहीं, किंवा हें आशीर्वादित ख्रिस्ती घर आहे असें त्याच्या लक्ष्यांत आलें नाहीं, असें कधींच झालें नाहीं.

दुखण्याबाण्यांत, किंवा मरणसंकटांत, त्या फारच उपयोगीं पडत असत, त्यामुळें लोक अशा प्रसंगीं वारंवार त्यांना बोलावून नेत. आपल्या इष्टमित्रांत जाऊन, पवित्रशास्त्राचें ज्ञान

व तारणाराची ओळख करून द्यावी, ह्मणून लौकरच, आठवड्यांतून दोन दिवस त्यांनीं त्या कामासाठींच, नेमून टाकिले. पुढें पुढें, पूर्वींची ओळख देळख नाहीं अशा घरींही त्यांचा शिरकाव होऊं लागला. त्यांचा हा धर्मोपदेशाचा प्रदेश फार वाढत गेला. कोठेंही त्या गेल्या, तरी ख्रिस्ती शांति व आनंद, त्यांच्या बरोबरच असत.

देवाची व मनुष्यांची त्यांनीं जी सेवा केली, तिचें केवळ शिखरच ह्मटलें असतां चालेल, असें त्यांचें काम ह्मणजे, त्यांनीं स्थापिलेलें चारच ब्राह्मण विधवांपुरतें विधवागृह होय. ह्या विधवा, ह्या घरांत रहायाला आल्या त्या वेळची त्यांची स्थिति अत्यंत शोचनीय होती. हें विधवागृह कसें अस्तित्वांत आलें, व त्याच्या योगानें चंद्राबाईच्या आयुःक्रमांत सुखाची भर कशी पडली, हें सांगण्यासारखें आहे. एक दिवस, नुकतेंच जिला वैधव्य प्राप्त झालें आहे, अशा एका गरीब ब्राह्मणज्ञातीय बाईच्या घरचें चंद्रीला बोलावणें आलें. ही बाई दुःखानें व संकटांनीं वेडावून गेली होती. चंद्रीनें थोडेसे कपडे बांधून बरोबर घेतले, व लागलीच ती तिच्या घरीं जायाला निघाली. ती त्या बाईच्या घरांत ह्मणजे एका भिकार, अंधाऱ्या, लहानशा धर्मशाळेंत जाऊन पहाते तों तिच्या दृष्टीस ज्याच्यावर केश काढून, विद्रूप केलेलें, एक स्त्रीजातीचें मस्तक ठेविलें आहे, असें चिंध्यांचें गांठोडें पडलें. त्या चिंध्यांनीं सुद्धां ते मृतप्राय झालेले अवयव

पुरतेपणें झांकलेले नव्हते. चंद्राबाईनें त्या बाईला सलाम केला. त्याबरोबर तिनें वर पाहिलें. तो तिचा चेहरा चंद्रीच्या मरेपर्यंत लक्षांत रहाण्यासारखा होता. मूळचा तो चेहरा पाणीदार असून, त्याच्या विशाल नेत्रांत बुद्धिमत्ता भरून उरली होती. पण हाय! हाय! दुःखानें, आणि हालअपेष्टांनीं, त्याचें किती भयंकर रूपांतर करून टाकिलें होतें! चंद्रीनें कळवळा येऊन तिला ह्मटलें "बाई, तुह्मांला अशा पाहून मला फार वाईट वाटतें. काय होतें तुह्मांला?"

**बाई:**—कांहीं नाहीं, मी मृत्यूची वाट पहात बसल्यें आहें; आतां मला हीं दुःखें सोसवत नाहींत. शिकस्त झाली आतां.

**चंद्री:**—पण सांगाल तर खऱ्या काय झालें तें? तुह्मी उठून बसतां का अंमळ?

**बाई:**—नाहीं, मला बसवत नाहीं. माझी कंबर मोडली आहे. मी पुष्कळ दिवस इस्पितळांत पडून होतें. पण आतां ते ह्मणतात आमच्याच्यानें कांहीं करवत नाहीं.

**चंद्री:**—मला वाटतें तुमची हकीगत कोठें तरी माझ्या ऐकण्यांत आली असावी. कित्येक ख्रिस्ती बायांनीं तुह्मांला भेटून, येशू ख्रिस्ताविषयीं सांगितलें नाहीं का?

**बाई:**—हो! हो तर. येशू किती प्रीतिकर आहे हें मीं ऐकिलें आहे. कांहींजणींच्या मनांत मी जाऊन त्यांच्या मडमसाहेबांजवळ रहावें असें होतें.

**चंद्री:**—मग कां जाऊन राहिलां नाहीं? तेथें तुमची चांगली सोय झाली असती.

**बाई:**—खरें, पण माझा ब्राह्मणधर्म पडला ना! मी कशी जाऊं?

"ब्राह्मणधर्म" हा शब्द तिनें मोठ्या आवेशानें उच्चारिला. त्या वेळेस तिच्या चेहऱ्यावर जात्यभिमान रेखल्याप्रमाणें दिसत होता. त्या बाईची ती कळवळा येण्यासारखी दुर्दशा, आणि तो अभिमान, यांचें मिश्रण फारच विलक्षण दिसलें. चंद्रीच्या लक्षांत त्याचा अर्थ आला, तरी ती ह्मणाली—"बरें बाई, माझ्या घरीं येतां का? मी सुद्धां एकदा ब्राह्मणच होतें. इतकेंच कीं आतां मला ख्रिस्तप्रीतीचा अनुभव झाला आहे."

**बाई:**—(उसासा टाकून ह्मणते)—नाहीं बाई, मला येतां येत नाहीं.

**चंद्री:**—बरें तर. तुह्मांला यायचें नसलें, तरी मी देतें हीं दोन पांघरुणें घ्यायाला तर हरकत नाहीं ना?

**बाई:**—तीं मी घेतलीं ह्मणून, तुह्मी मला आपल्या घरीं तर घेऊन जाणार नाहीं ना?

**चंद्री:**—भलतेंच. तुह्मी या किंवा नका येऊं, हीं तुह्मांला दिलीं आहेत. तुमच्यासारखा कठिण प्रसंग वैऱ्यावरहि न येवो.

**बाई:**—काय करूं? मला तुमच्याबरोबर यावेंसें फार वाटतें. पण इलाज नाहीं. असली दया आणि प्रीति, माझ्या कधीं अनुभवांत नाहीं.

**चंद्रीः**–बाई, यांत कांहीं नाहीं. तुह्मी माझ्या येथें आलां तर यापेक्षां फार फार थोर प्रीति कशी आहे तें तुह्मांला समजेल.

**बाईः**–काय करूं? मी ब्राह्मण आहें ना?

**चंद्रीः**–तें असो; पण तुमची अशी अवस्था कशानें झाली? मला आपली सगळी हकीगत सांगा पाहूं.

**बाईः**–त्या कर्मकटकटीची आठवण सुद्धां नको, असें मला झालें आहे. पण तुमच्यासारख्या परोपकारी बाईला ती सांगूं नको, तर कोणाला सांगूं? ऐका तर–देवाच्या दयेनें मला कांहीं कमी नव्हतें. दोन मुलगे होते, आमची नवराबायकोची एकमेकांवर चांगली प्रीति होती. पण मला दुसरा मुलगा झाल्यावर लौकरच माझें कपाळ फुटलें. वडील मुलगा चार वर्षांचा, आणि धाकट्याला तर नुकतें दीड वर्ष होत आलेलें; मला बाहेर तोंड काढायाची चोरी; तेव्हां माझ्या दिराला चांगलेंच फावून, त्यानें आमच्याजवळ होतें नव्हतें तें सारें लुबाडून घेतलें; व मी पक्की परतंत्र झालें. नवऱ्याचें वर्षश्राद्ध झालें नाहीं तों वडील मुलगा आटपला. पुढें लौकरच माझें सगळें ह्मणणें एका बाजूला गुंडाळून ठेवून, धाकट्या मुलाला दत्तक घेतलें. ह्मणजे रिवाजाप्रमाणें व कायद्याप्रमाणें मला नुसता देतील तो तुकडा खाऊन रहाण्याची मालकीण करून टाकिलें. आमचा ब्राह्मणविधवांचा जन्म ह्मणजे कसा कुत्र्याच्या जन्मापेक्षां वाईट असतो, हें तुह्मांला सांगून कळायाचें नाहीं. तशांत

आतां मी घरांत सगळ्यांना अशुभ, कर्मकरंटी झालें. सासू तर अंगांत भूतसंचार झाल्याप्रमाणें माझ्या मागें लागली. दीर, जाऊ, नणंदा साऱ्यांनीं नको हा जीव असें करून सोडावें. देतील तें खावें, ज्याचें त्याचें बोलणें सोसावें, व रात्रंदिवस गुलामगिरी करावी, याप्रमाणें माझे दिवस जाऊं लागले. तरी मीं ह्मणावें "जें जें दैवांत असेल तें तें सोसावें आणि तितकेंहि सोसून अन्नानें दिवस काढावे." पण एका नणंदेनें माझ्या सासूचे कान भरिले, व साऱ्यांनीं एक होऊन माझ्यावर भलतेंच कुभांड रचून, मला घरांतून हांकलून लाविलें. पुढें एका द्वाड मुसलमानानें माझी थोडीशी बेइजत केली; तरी त्याच्या तावडींतून निसटून मी माहेरीं गेलें. माझे आईबाप मेलेले, व भाऊभावजयांच्या कानीं आधींच माझ्याविषयीं भलत्या सलत्या गप्पा पडलेल्या, तेव्हां त्यांनींहि मला थारा दिला नाहीं. झालें, शेवटची आशा होती, ती पण निष्फळ झाली. काय करायाचें आहे? शेवटीं आतां पुरे हें जिणें, यापेक्षां मरण बरें असें वाटून मी कोणाकडे न जातां, एका तळ्यांत जाऊन उडी घेतली. पण तेथेंहि माझें दुर्दैव हात जोडून पुढें उभेंच! माझें हें कृत्य एका पोलिस शिपायाच्या दृष्टीस पडून, मला वर काढण्यांत आलें. तळ्यांत पाणी फार नसल्यामुळें खडकाचा तडाखा बसून माझी तंगडी मोडली होती, ह्मणून त्यांनीं मला सरकारी दवाखान्यांत पाठविलें. मला दवाखान्यांत कित्येक महिने रहावें लागलें. शेवटीं मी बरी होऊन

तेथून सुटलें. पण मग मला जावें कोठें ही मोठीच पंचाईत येऊन पडली. शेवटीं एका ठिकाणीं ब्राह्मणांची वसति असून, त्यांतलीं बरींच घरें आपल्या ओळखीचीं आहेत, हें लक्षांत येऊन मी मोठ्या कष्टानें तिकडे गेलें, आणि पोटावारी कोठें तरी काम मिळालें तर पाहूं लागलें. किती ठिकाणीं दांत विचकल्यावर मला एकदाचें काम मिळालें. या स्वयंपाकाच्या धंद्यावर मीं बरींच वर्षें काढिलीं. एकदा एका घरीं चाकरीस असतां, कामाच्या गर्दीमुळें तव्यावरची पोळी परतायाचें मला भान राहिलें नाहीं आणि ती जळली. त्या वेळेस मी खिडकींत बसलें होतें. पोळीचा करपट वास आल्याबरोबर माझे धनीसाहेब संतापून आले व त्यांनीं मला एक लाथ दिली. त्यासरशी मी खालीं गल्लींत पडून माझी कंबर मोडली. पुन्हा माझी रवानगी दवाखान्यांत झाली. कित्येक महिने मी तेथें होतें. अखेर ही बरी होत नाहीं असें ठरून मला तेथून काढून देण्यांत आलें. आतां बरीक माझी कंबर खरीच मोडली. कित्येक उपदेशकिणी मला वारंवार येऊन भेटत असत. त्यांनीं मला शास्त्र वाचून दाखवावें, व बोध करावा. त्यांना मी तुमच्या मडम साहेबांकडे येतें ह्मणून वचन दिलें होतें. पण पुढें पुढें त्या मला भेटल्या तरी, मीं त्यांना चुकवावें, दिलेल्या वचनाचें मला मोठें भय वाटे. शेवटीं मी—मध्यें कांहीं तरी सोय लागेल, किती झालें तरी मी ब्राह्मणीण आहें, मजवर कोणी तरी दया

करील, असें मनांत येऊन मीं तिकडे जाण्याचा विचार केला. पण जावें कसें? आंता तर मला बसतां सुद्धां येत नव्हतें. तेव्हां एका बगीवाल्याला, मागेल तितकें भाडें कबूल करून, मी तिकडे जाण्याची सोय केली. तो बिचारा किती ठिकाणीं तरी मला घेऊन हिंडला असेल, पण असल्या जीवंत मढ्याला थारा कोण देणार? मला न चालण्याचें सामर्थ्य न बसण्याचें. मी नाना प्रकारांनीं विनंत्या केल्या, किती देवांच्या शपथा घातल्या पण कोणाच्या अंतःकरणाला द्रव आला नाहीं. बगीवाला नाहीं नाहीं तसल्या शिव्या देऊं लागला. शेवटीं इतकी मेहनत करून, आपल्याला कांहीं मिळण्याची आशा नाहीं, असें पाहून त्यानें मला तेथेंच गटाराजवळ उतरिलें; व रागारागानें एक धक्का देऊन तो बगी घेऊन चालता झाला. मी तेथें, उघड्यावर दुसरे दिवशीं सूर्योदय होईपर्यंत, अन्न अन्न करीत पडून राहिलें. सूर्योदयानंतर एका पोलिसानें मला पाहिलें व एक बगी बोलावून या धर्मशाळेंत आणून टाकिलें. सध्या मी येथें मरणाची वाट पाहात पडलें आहें. हें ऐकून चंद्रिकाबाई ह्मणाल्या—“ असें नका ह्मणूं बाई; तुह्मांला सुद्धां घर आहे, तुमच्यावर सुद्धां प्रीति करणारें कोणी तरी आहे. मात्र तुह्मीं त्याचा स्वीकार केला पाहिजे. तुमच्या जातभाईंना तर तुमची पर्वा नाहींच. चला बाई, माझ्या घरीं चला. कृपा करून चलाच.”

**बाई**—नको नको ! काय करूं ? माझ्याच्यानें येववत नाहीं.

**चंद्रिका**—बरें तर तुह्मी कामा इस्पितळांत जातां का ? पाहा, तेथें तुह्मांला उपचार झाले तर.

**बाई:**—"जातें; अहाहा, माझ्या साऱ्या जन्मांत, तुमच्या सारखी प्रीति मला कोणीं दाखविली नाहीं." हे शब्द उच्चारीत असतां तिच्या गालांवरून आसवांचा पूर वहात होता. ती पुन्हा ह्मणाली "मला तुमच्या घरींच यावेंसें फार वाटतें, पण उपाय नाहीं. ब्राह्मणाचा जन्म पडला ना ? तेवढें नसतें तर किती बरें झालें असतें !" चंद्राबाईनीं एक बगी बोलाविली, व मोठ्या कष्टानें त्या बाईला आंत बसविलें. तिला स्वतः मुळींच आवांका नव्हता; कारण तिचा पाय थेट कमरेपासून गुडघ्यापर्यंत, निर्जीव झालेला होता. बगींत बसल्यावर ती चंद्रीकडे क्षणांत प्रेमळ दृष्टीनें क्षणांत साशंक मुद्रेनें, पाहात होती. तिनें तिला ह्मटलें "बाई माझ्या नेसूंचें लुगडें खरोखरच तुह्मीं मला दिलेंत का ? तुमच्या घरीं मी न आलें तरी दिलेंत का ?"

गरीब बिचारी ! निष्काम प्रीतीचा अनुभव तिला कधींच नव्हता; त्यामुळें फुकट कोणी कोणाला कांहीं देतें, हें तिला संभवनीय देखील वाटेना.

कामा इस्पितळांत तिला घेतलें, व तिची उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवून, पुष्कळ औषधोपचार करण्यांत आले, पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

चंद्राबाई वारंवार तिच्या समाचाराला जात. त्यामुळें तिला

बरेंच समाधान वाटे. शेवटीं इस्पितळांत राहून कांहीं उपयोग होत नाहीं, असें दिसून आल्यामुळें डाक्टरनें तिला कोठें जावयाचें ह्मणून विचारिलें. तेव्हां तिनें सांगितलें कीं, माझा एक पुतण्या आहे त्याच्या घरीं मला पाठवा. त्यावर डाक्टरांनीं विचारिलें "बाई, तुमच्या जवळ तेथपर्यंत जाण्याला पैसे आहेत का ?" बिचाऱ्या बाईनें दुःखाचा सुसकारा टाकून ह्मटलें "कोठून असणार ? माझ्याजवळ कोठला पैसा ? मरुं द्या मला येथेंच."

चंद्रिकाबाई लौकरच पुन्हा त्या बाईला भेटायाला आल्या. त्यांनीं तिला तिच्या पुतण्याकडे पोंचवायापुरते पैसे डाक्टराला दिले. बाईला इतकें मात्र सांगून ठेविलें कीं, जर तुमचें तिकडेहि न जमलें तर माझ्या घरीं खुशाल या. तुमची ही अवस्था पाहून, माझा जीव तिळतिळ तुटत आहे.

डाक्टरनें त्या बाईला तिच्या पुतण्याच्या घरीं पाठवायाची तजवीज केली. जातांना चंद्राबाईचा निरोपहि सांगितला. तो ऐकून बाईचे दोन्ही डोळे गर्रकन भरून आले. ती ह्मणाली "किती दयाळू तरी ही बाई आहे ? हिचे उपकार मी कसे फेडूं ! डाक्टरसाहेब, जर माझ्या पुतण्यानें मला थारा दिला नाहीं, तर मी पुन्हा इकडे येईन. मग कृपा करून मला माझ्या त्या हितकर्त्रींकडे पाठवा." याप्रमाणें ती बाई पुन्हा एकदा, चंद्रिकाबाईपासून गेली. पुन्हा ही आपणाला भेटेल, अशी चंद्राबाईला

आशा नव्हती. तरी तिनें कोणत्या तरी मार्गानें खीस्ताकडे यावें ह्मणून, ती नित्य प्रार्थना करीत असे.

याला कांहीं महिने लोटल्यावर एक दिवस एकाएकीं कामा इस्पितळांतून चंद्राबाईंना निरोप आला कीं कृष्णाबाई येथें आली असून तुह्मांला भेटूं इच्छीत आहे. अर्थात् हा निरोप कळतांच, त्यांना पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें.

कृष्णाबाईचा नुसता अस्थिपंजर राहिला होता. तिच्या चेहऱ्यावर उपासमारीचीं स्पष्ट चिन्हें दिसत होतीं, पण चंद्रीकडे पाहून त्यावर पुन्हा तजेला आला. तिनें मोठ्या उत्सुकतेनें, आपला हात पुढें केला. ती ह्मणाली "मी तुमच्याकडे, आणि ज्यानें माझ्या सर्व पापांची क्षमा केली आहे, त्याच्या कडे परत आलें आहें." हे शब्द ऐकून चंद्रीला मोठें नवल वाटलें. पण त्यांचा अर्थ समजून घेण्याची ही वेळ नव्हे, असें जाणून तिनें कृष्णाबाईला आपल्या घरीं नेलें, व तिची इतक्या ममतेनें निगा ठेविली कीं, थोड्याच दिवसांत तिच्या वरची प्रेतकळा जाऊन, ती पुन्हा सजीव झाल्यासारखी दिसूं लागली. आंगांत बरीच ताकद आल्यावर, तिनें चंद्राबाईला आपली सर्व हकीगत सांगितली. तिचा थोडक्यांत गोषवारा असा होता. कामा इस्पितळांतून ती आपल्या पुतण्याच्या घरीं गेली. पण तिला समजलें कीं आपल्या पुतण्याला मरून कित्येक वर्षें झालीं असून, घरांत त्याची बायको मात्र आहे. तिनें कृष्णाबाईला पा-

हातांच, तिची मनास वाटेल तशी शोभा करून, हा हाडांचा सांपळा घेऊन माझ्या घरीं मरायाला आलां कशाला, ह्मणून प्रथम दर्शनींच अक्षता टाकिल्या. तरी दोन चार दिवस, अर्ध-पोटीं राहून, व शिव्याशाप सोसून, तिनें त्या घरांतच काढिले. पुढें आसपासच्या ब्राह्मणांनीं, मोठीं मनें करून कांहीं दिवस तिला तुकडा दिला. पुढें तेहि कंटाळले. मग काय? आंगावर चिंधी नाहीं, पडायाला जागा नाहीं, खायाला अन्न नाहीं, अशी भयंकर दैन्यावस्था होऊन, आतां मरण येईल तर बरें, असें तिला झालें. एक दिवस तर ती खरोखरच मेली असती; पण अवचित एका मडमेची गांठ पडून तो प्रसंग टळला.

ती मडम आणि तिच्या उपदेशकिणी, कृष्णाबाई होती त्या घरीं येऊन इतर बायांना उपदेश करीत होत्या. विधवांची कींव ख्रिस्ताला किती आहे तें त्या सांगत होत्या. तें ऐकून आपण किती वेळां ख्रिस्ताला धिक्कारिलें आहे, हें मनांत येऊन कृष्णा-बाईला फार वाईट वाटलें. ती मोठ्यानें ओरडून ह्मणाली "ख्रिस्ता, ख्रिस्ता, मज पापिणीवर दया कर, मडमसाहेब मला वांचवा." हे शब्द ऐकून मडमेला आश्चर्य वाटून, तिनें कृष्णा-बाईविषयीं चौकशी केली. पण मौज ही कीं, जे लोक या क्षणापर्यंत, तिचा त्रास करून तिला हव्या तशा शिव्या व शाप देत होते, तेच आतां मडमेला ह्मणूं लागले कीं, "ही बाई मोठ्या कुलीन घराण्यांतली आहे; आह्मी हिचा सांभाळ करीत

आहों, पण ती फार आजारी असून आह्मी गरीब पडल्यामुळें, आमच्या हातून तिची व्हावी तशी व्यवस्था होत नाहीं. कृपा करून आपण कांहीं पैसे द्याल तर, आह्मी हिचा उत्तम प्रकारें प्रतिपाळ करूं व आपले उपकार जन्मभर विसरणार नाहीं." पण कृष्णाबाईनें मडमेला सांगितलें कीं "हें सारें थोतांड आहे, मडमसाहेब तुह्मी यांचें मुळींच ऐकूं नका. मला कृपा करून आपल्याबरोबर घेऊन जा." तें ऐकून मडमेनें तिला ह्मटलें "बरें आहे, मी नोकर पाठवितें, ते तुह्मांला घेऊन येतील." इतकें ह्मणून मडमेनें पाठ देखील पुरती फिरविली नाहीं; तोंच, चाळींतल्या लोकांनीं बिचाऱ्या कृष्णाबाईवर शिव्यांचा पाऊस पाडायाला आरंभ केला. तो ऐकतांच मडमेला तेव्हांच दिसून आलें कीं, हिला आतां येथें सोडून जाण्यांत अर्थ नाहीं. तिनें आपल्या सोबतिणींच्या, व टांगेवाल्याच्या मदतीनें, तिला टांग्यांत बसविलें, व कृष्णाबाईचे **सखेसोयरे** शिव्यांची लाखोली वहात असतां, घरचा रस्ता सुधारला.

याप्रमाणें आपली हकीगत सांगून, कृष्णाबाई ह्मणाली— "ही मडम फारच मायाळू आहे. तिची एक मोठी शाळा आहे. या शाळेंत मला ठेवणें ह्मणजे अडचण तर खरीच, तरी पण मी तेथें होतें तोंपर्यंत, मडमसाहेबांनीं मला कांहीं कमी पडूं दिलें नाहीं. मीं त्यांना आपला सगळा इतिहास सांगितला. तो ऐकून, त्या ह्मणाल्या, बाई तुह्मांला चंद्राबाईकडे परत गेलें पा-

हिजे. दुसरेच दिवशीं त्यांनीं आपल्या नांवाची चिठी तुह्मांला देण्यासाठीं देऊन, मला कामा इस्पितळांत पाठविलें. त्यांनीं तुह्मांला फार फार सलाम सांगितला आहे. तुह्मी माझ्यावर जे उपकार केले आहेत, त्याबद्दल त्या तुमचे उपकार मानीत आहेत! मी कोण? तुह्मी कोण? आणि त्या मडमसाहेब कोण? खरोखर ख्रिस्ताचे लोक आमच्या लोकांपेक्षां शतपट बरे! मला आतां लौकर ख्रिस्ती करा." असें ह्मणून कृष्णाबाईनें चंद्रिकाबाईला, मडमेनें आपलें नांव लिहून दिलेली चिठी दिली.

"मिसेस बर्चेल! काय! इतकें ह्मणून चंद्री एकदम उभीच राहिली, किंवा ती कशाची उभी राहिली? आनंदाच्या उकळीनेंच तिला उचलून धरिलें! कारण आपली खरी जन्मभूमि, व आपली धर्ममाता, यांचीं नांवें ती कधींहि विसरली नव्हती. आपल्या बापानें आपणास पळवून आणिलें त्या दिवसापर्यंत, आपलें सर्वस्व होऊन बसलेल्या, त्या प्रेमळ मडमेचा विसर तिला स्वप्नांत सुद्धां कधीं पडला नव्हता. तिनें कृष्णाबाईवर प्रश्नांचा जसा पाऊस पाडला. ती मडम वयानें केवढी आहे? तिचा चेहरा तुमच्या लक्ष्यांत आहे का? तिचें हसणें किती तरी मधुर आहे! नाहीं का? ती मोठी उद्योगी आहे; होय ना? असे किती तरी प्रश्न चंद्रीनें त्या बाईला केले. त्यांचीं उत्तरें समाधानकारकच मिळालीं. नाहीं ह्मणायाला मिसेस बर्चेल आतां वैधव्यदशेंत असून, फार वृद्ध झाल्या आहेत,

त्यांचे केंस पिकून गेले आहेत, व प्रकृतिहि असावी तशी नाहीं; ही हकीगत मात्र काळजी वाटण्यासारखी होती.

लौकरच, अर्थात् होईल तितकें लौकरच, चंद्रीनें, आपल्या "प्रिय मडमेला" पत्र लिहिलें. त्यांत तिनें आपला इत्थंभूत वृत्तांत लिहून पाठविला. त्याचें उत्तर आलें, तें उत्तर, आज कित्येक वर्षें, आपल्या हरवलेल्या लाडक्या मुलीला, निरंतर प्रेमावरणांत ठेवणाऱ्या हृदयांतून निघालेलें! त्यांत हर्ष, आश्चर्य, प्रीति, कृतज्ञता! नव्हतें काय? येथून पुढें हा आनंददायी पत्रव्यवहार सुरू झाला; व लौकरच चंद्रीनें आपल्या त्या हितकर्त्रीचें, खिस्तद्वारा मातेचें, मोठ्या उत्साहानें आपल्या घरीं स्वागत केलें.

आतां आपणास ह्या दोन विधवांना अशाच आनंदांत मग्न व खिस्तसेवेंत तत्पर, ठेवून त्यांची रजा घेतली पाहिजे. चार अनाथ विधवांची सोय व्हावी, अशी आतां त्यांच्या घराची रचना झालेली आहे. ह्या चारी विधवांच्या हकीगती फार हृदयद्रावक आहेत. रखमाबाईच्या नवऱ्यानें, मागें जी मालमत्ता ठेविली होती, तिच्या उत्पन्नांत त्यांचें व त्यांच्या आश्रित विधवांचें उत्तम रीतीनें चालत आहे. त्यांत कधीं कधीं कित्येक मित्र, प्रभूसाठीं काढून ठेवलेल्या पैशांतून, थोडीबहुत भर घालित आहेतच.

कित्येक प्राचीन लोकांप्रमाणें त्या आपलें वर्तनरूप सुगंधी तेल प्रभूच्या पायांवर ओतीत आहेत, व तो त्यांना, व त्यांच्या

संबंधांतील सर्वांस, निरंतर आशीर्वाद देत आहे. तो त्यांच्याकडून आपली सेवा अधिकाधिक करून घेईल! त्यांची प्रीति, व प्रिय कृति, तो आपल्या स्मरणवहींत लिहून ठेवीत आहे. त्या शेवटल्या दिवशीं वाचण्यांत येतील.

"जेव्हां मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवानें येईल, व त्याबरोबर सर्व पवित्र दूत येतील, तेव्हां तो आपल्या गौरवाच्या आसनावर बसेल. तेव्हां राजा आपल्या उजवीकडल्यांस ह्मणेल, अहो माझ्या बापाचे आशीर्वादित या. जें राज्य जगाच्या मांडण्यापासून तुह्मां करितां तयार केलें, तें वतन करून ध्या. कारण कीं, मी भुकेला होतों तेव्हां तुह्मीं मला खायाला दिलें; तान्हेला होतों तेव्हां मला प्यायाला दिलें; परका होतों तेव्हां मला घरांत घेतलें; उघडा होतों तेव्हां मला पांघरूण दिलें; रोगी होतों तेव्हां माझा समाचार घेतला."

"या माझ्या भावांतील लहानांतून एकाला तुह्मी असें केलें तितक्यावरून मलाच केलें आहे."